# आजच्या जगात वावरताना

लेखक :
प्रकाश राऊत
मिनाक्षी एन्क्ल्हेव,
107 बी, स्टेट बँकेसमोर,
कँम्प अमरावती 444602
मो. : 9552543947



ई प्रकाशक ई :साहित्य प्रतिष्ठान
www. esahity. com
esahity@gmail. com
ई प्रकाशन : ७ मार्च २०१६

मला ज्यांची पुस्तके वाचतांना
प्रेरणा मिळाल्या
त्या सर्व लेखकांस......

# अनुक्रमणिका

# माझे मनोगत

हा माझा लिखाणाचा दुसरा प्रयत्न. मी प्रथम 'नोकरशाहीतील बाळूच्या गंमतीजमती' हे पुस्तक लिहिण्याचा प्रयत्न केला आहे. माझ्या पहिल्या प्रयत्नाला कोण प्रकाशक मिळेल या विवंचनेत मी एकदा नाशिक येथेच गोल्फ क्लब मैदानावर भरलेल्या पुस्तक प्रदर्शनात प्रवेश केला. तेथे पुणे, नाशिक, कोल्हापूर इत्यादी प्रकाशकांची पुस्तके विक्रीसाठी उपलब्ध होती. त्यापैकी सहज एका प्रकाशकाला विचारणा केली की आपण पुस्तके विकताच की काही नवीन लेखकांना आपल्या क्षेत्रात वाव देता तेंव्हा योगायोगाने माझी श्री. कुणाल हजेरी या व्यक्तीशी ओळख झाली. या व्यक्तिमध्ये कोणत्याही प्रकारचा मला अहंकार जाणवला नाही, आजच्या तरूणामध्ये असलेला उत्साह व निरहंकार वृत्तीने मी त्या व्यक्तिकडे आकर्षित झालो. माझी त्यांचेशी कोणत्याही प्रकारची ओळख नसतांना माझे बोलणे निमूटपणे ऐकून घेतले व माझे पहिले पुस्तकाच्या स्क्रीप्ट विषयी उत्सुकता दाखविली त्यामुळे मला अतिशयच आनंद झाला. हया त्यांच्या सहकार्याने व ज्ञान प्रकाशनाच्या सौजन्याने माझे प्रथम पुस्तक पुणे येथून सन २०११ मध्ये यशस्वीरित्या प्रकाशीत झाले. मी याकरीता श्री. कुणाल हजेरी यांचा फार आभारी आहे. व त्यांनी या औदार्यपूर्ण व अनपेक्षीतपणे दर्शविलेल्या त्यांच्या सहकार्याबद्दल ऋण व्यक्त करण्यापेक्षा मी त्यांचे ऋणातच राहू ईच्छीतो.

त्यांनी प्रतिसाद दिल्यानंतर माझा उत्साह अधिक बळावला व त्या उत्साहामुळेच आज मी मला मिळालेल्या फावल्या वेळाचा सदुपयोग करण्याच्या हेतूने हा दुसरा लेखन प्रपंच पुन्हा सूरू केला आहे. यावेळी मात्र नेमके कोणते लेखन करावे या विचारातच मला आजच्या काळाची गरज म्हणून 'आजच्या जगात

वावरतांना' हा विषय सूचला व त्या दृष्टीने मी प्रयत्न करीत आहे. माझ्या आतापर्यंतच्या वाचनामध्ये मी अग्रक्रम जर कोणत्या पुस्तकांना देत आलो असेल तर तो म्हणजे जीवनाच्या विकासात्मक पुस्तकांना कारण अशा पुस्तकांच्या वाचनातून, आपलं वय कितीही वाढत असलं तरी अजूनही बरंच काही शिकायचे राहले आहे याची सातत्याने जाणीव होत राहते. तसेच अशा प्रकारच्या जीवनाविषयक पुस्तकांमुळे काही महत्वाच्या गोष्टी आढळून येतात. तसेच बरेच लेखक मंडळी काही उत्तम अशा कोटेशन्सचा वापर त्यांच्या पुस्तकामध्ये करतांना आढळतात. माझ्याही वाचनात बरेचदा उत्तम अशी वाक्ये येतात तेंव्हा मी ती आवर्जून टिपून ठेवतो. या कोटेशन्सचा इतरांनाही उपयोग व्हावा असे मला वाटते. वाचनातील या बाबी ईतरांनाही सांगितल्या तरी त्याचे सर्वांकडून स्वागतच होत असते. कारण आजकाल या अत्याधुनिक काळामध्ये व जीवनाच्या धकाधकीमुळे सर्वांनाच वाचनाकरीता पुरेसा वेळ मिळेल याची शाश्वती नसते. तसेच काही कोणाला सांगायची इच्छा असली तरी ते ऐकून घेण्यास पुरेसा वेळ असेल हेसुध्दा सांगता यायचे नाही. करीता अगदी कमी शब्दात व लहानशा पुस्तकामध्ये छोटया प्रकरणाच्या माध्यमातून जीवनाविषयक बाबी सादर केल्या तर अशा प्रकारचे लिखाणाचे वाचकांकडून स्वागत होइल असे निश्चीतच वाटते.

पहिले पुस्तक मी मुद्दामच हलक्या फुलक्या वाचनासाठी तयार केले आहे त्यामुळे त्यात जीवनातील प्रसंगातून विनोद कसे निर्माण होतात हे आहे पण या पुस्तकात मात्र विद्यार्थ्यांना प्रेरणा कशी मिळेल व त्यांचे मनोरंजन ही होईल असा दुहेरी उद्देश मी ठेवला आहे. याचे मुख्य कारण असे की आजपर्यंत जगात सर्वात जास्त पुस्तके ही धार्मिक विषयांवरच लिहिल्या गेलेली आहेत. व आज काळांमध्ये एवढा प्रचंड बदल झाला आहे की बरीच मंडळी या धार्मिक सोंगढोंगाला कंटाळलेली आहे. आजच्या काळात या धार्मिक पुस्तकांचा मूळ उद्देशच समूळ नष्ट झाल्यासारखे वाटत आहे. पुरातन काळातील घटनांना त्या घडो अथवा न घडो एका सिरीयलचे रूप प्राप्त झाले आहे. व त्या सर्व काल्पनिक संकल्पना आहेत असेच आधुनिक वाचकांना वाटते. तेंव्हा दूरदर्शन पाहण्याची सवय लागण्यापेक्षा मुलांना वाचनाची

आवड निर्माण व्हावी व तव्दतच त्यांना जीवनातही अशा प्रकारची वाचन चळवळ उपयोगी पडावी या उद्देशाने मी पुस्तकाची रचना केलेली आहे.

भूतकाळ व भविष्यकाळ या दोन्ही काळापेक्षा सर्वात जास्त महत्व कशाला असेल तर ते आजचं जीवन जगण्याला म्हणजेच वर्तमान काळाला. कारण भूतकाळातील घटनांना मनामध्ये उगाळून उगीच चिंता करण्यापेक्षा आजच्या वर्तमान काळात जगतांना नेमक्या कोणत्या अडचणी येतात किंवा येणा-या अडचणींवर कशी मात करावी व आपलं जीवन सुखी कसं होइल 'या उद्देशाने व विशेषतः विद्यार्थ्यांच्या जीवनोपयोगी पडावे यासाठी हा अल्प प्रारंभ व प्रयत्न केला आहे. त्यामुळे 'आजच्या जगात वावरतांना 'नेमकी कशाची आवश्यकता आहे हे अत्यंत महत्वाचे आहे व ते विशेषतः विद्यार्थ्यांना माहित होणे फारच महत्वाचे आहे असे मला व्यक्तीशः वाटते.

विज्ञानाची प्रगती गरजेनुसार प्रचंड वेगाने वाढत आहे पण मानसिक परिवर्तनाचा वेग मात्र अजूनही मंदावलेलाच आढळतो ही दुदैवाची बाब आहे. आज थिअरीपेक्षा प्रॅक्टीकलला जास्त महत्व आहे त्या दृष्टीने काही विचार विनीमय व चर्चा करावी. असे वाटले. वर्तनाच्या थिअरीमध्ये चांगल्या गोष्टींचा उल्लेख असतो पण त्याची अंमलबजावणी होणे महत्वाचे असते. अर्थात या पुस्तकातील सर्वच बाबी सर्वांना आवडंतीलच हे मुळीच सांगता यायचे नाही. ते आपणच आपल्या बुध्दीने ठरवायचे आहे कारण प्रत्येकाचे जीवन व त्याची जगण्याची शैली ही स्वतंत्र असते त्यामुळे या अशा वाचनातून संभ्रम व वाद निर्माण करण्यापेक्षा केवळ मनोरंजन, आनंद तसेच मार्गदर्शन मिळाले तरी पुरे... या पुस्तकामधून किमान विद्यार्थ्यांना जरी प्रेरणा मिळाली व त्यांचा उत्साह वाढला तरी माझा उद्देश सफल झाला असे मला वाटेल.

खास विद्यार्थ्यांच्या संग्रहाच्या दृष्टीने बऱ्याच ठिकाणी मी या पुस्तकामध्ये इंग्रजी कोटेशन्स वापर जसाच्या तसा केलेला वाचकास आढळेल. त्याचा मुख्य उद्देश अशा प्रकारचे कोटेशन्स जर संभाषणामध्ये सामान्य विद्यार्थ्यांनी वापरले तर भाषेमध्ये उठावदारपण येतो व भाषेचा प्रभावही पडतो सूरूवातीची काही प्रकरणे थोडी गंभीर झाली असावी करीता मी पुस्तकाच्या मध्यंतरी विनोदात्मक असा मनोरंजनाचाच भाग प्रस्तुत केलेला आहे. जीवनाचा सदुपयोग प्रत्येकाला योग्य रित्या

करता यावा यासाठी मी लहानपणी वाचलेल्या ‘जीवनाचा सदुपयोग‘ या स्वामी शिवानंदाच्या पुस्तकाचा आठवत असलेला भागसुध्दा यामध्ये सामील केला आहे. एकंदरीत सर्वकंष दृष्टी ठेवून संक्षिप्त पुस्तक तयार करण्याचा हा माझा प्रयत्न कसा झाला हे मी सूज्ञ वाचकांवरच सोडत आहे.

बघू या आपण हया दुसऱ्या प्रयत्नाससुध्दा किती यश मिळते ते.... असो. अर्थात या प्रयत्नालासुध्दा प्रकाश झोतात आणणारे श्री. कुणाल हजेरी हे माझ्या बाबतीत अजूनही उत्साही आहेत करीता मी त्यांचे परत एकदा आभार मानतो. वाचकांनो एक विनंती अशी की आपण आपली मते मला जरूर कळवावी व मलासुध्दा आपल्या पुढील अपेक्षा कळवून माझा लिखाणाचा उत्साह वाढवावा या सदीच्छेने सर्वास नम्र विनंती.

**-------प्रकाश मा. राऊत**

**---९५५२५, ४३९४७**

# आजच्या जगात वावरतांना. . . . .

-प्रकाश मा. राऊत

# आजचा काळ

काळ आणि वेळ ही निसर्गाने माणसाच्या हातात ठेवलेली नाही. त्यामुळेच या काळाचा नेमका प्रारंभ केंव्हा व कसा झाला याचे रहस्य अजूनही विज्ञानाला पूर्णपणे समजलेले नाही. या सृष्टीची निर्मिती कधी झाली व कोणी केली यावर खूप प्रकारचे तर्क वितर्क, पूर्वीच्या ऋषीमुनींनी काढलल्या तर्कावरून व त्यांनी शोधलेल्या मंत्र तंत्र वेद वाड. मयावरून काढण्यात आलेले आहेत त्या दृष्टीने विसाव्या शतकापर्यंत अल्बर्ट आइनस्टाइनच्या अत्याधुनिक थिअरीपर्यंत आपण येवून पोहोचलेलो आहोत. आणि आजच्या २०११ पर्यंतचा स्टीफन हॉकींग यांचा विचार पाहला तर आजच्या जगात ईश्वरच नाही येथपर्यंत मानवाची मजल पोहोचलेली आहे. पूर्वीच्या वेद वाड.मयाचा विचार लक्षात घेतला तर निर्मीतीच्या पूर्वी काय होते असा कधी कधी सर्वसामान्यांना प्रश्न पडतो. वास्तविक आपल्या पूर्वीच्या अपौरूषेय अशा वेद वाड. ायानुसार त्यातूनच असा बोध होतो की ‘तमआसित्तमसा गूढमग्रे ‘म्हणजेच अंधार होता व तोही कसा तर अंधारासारखा असे वर्णन पहावयास मिळते. त्यानंतर ब्रम्हाची निर्मीती म्हणजेच या विश्वाची निर्मीती झाली असा उल्लेख धार्मिक पुस्तकांमध्ये आढळतो. याबाबत अल्बर्ट आइन्स्टाइन म्हणतो - Universe is finite but unlimited अशा या अमर्यादीत व अफाट विश्वात असंख्य तारे आहेत. एक एक तारा म्हणजे एक एक मोठा सूर्यच आहे. आपली सूर्यमाला हीसुध्दा

एका आकाशगंगेचा लहानसा भाग आहे व अशा अनगिनत आकाशगंगा या विश्वात अस्तित्वात आहेत. यापैकी आपण एका लहानशा सूर्यमालेत राहतो. या सूर्यमालेतील जवळचा ग्रह पृथ्वी... या छोटयाशा पृथ्वीच्या भूभागावर निसर्गनियमानुसार सर्व प्राणीमात्र व आपण जीवन जगत आहोत. पण विज्ञानाच्या नियमानुसार व आधुनिक संशोधनानुसार सृष्टीची निर्मीती ही बिग बँग थिअरीनुसार झाली असे म्हणतात. असे जर असेल तर त्या थिअरीनुसार आपल्या पृथ्वीसारखे असंख्य ग्रह आपल्या विश्वात असण्याची शक्यता आहे. Erich Von Daniken च्या Chariots of the God या पुस्तकामध्ये याचे सविस्तर विश्लेषण आलेलेच आहे. आपण आपल्या पृथ्वीवर जेवढे शोध लावले आहेत व आपण जितके प्रगत आहोत. त्यापेक्षाही कदाचीत जास्त प्रगती ईतर ग्रहांवर वसती असेल तर झाली असल्याची संभावना नाकारता येत नाही, किंबहूना या पृथ्वीतलावरील काही विशिष्ट आश्चर्यांचा अभ्यास केला असता असे आढळते की या पृथ्वीवर यापूर्वी कदाचीत इतर ग्रहावरील परग्रहवासीयांनी भेंट दिली असावी असे पुरावे उपरोक्त पुस्तकांमध्ये फोटोग्राफसहीत दर्शविण्यात आले आहेत उत्खननाच्या पुराव्यासहीत व आकृत्यांसहीत वरील पुस्तकामध्ये बरेच परिच्छेद लिहिलेले आहेत. या प्रकारचे अनुवाद असलेले ‘पृथ्वीवर मनुष्य उपराच’ अशा आशयाची पुस्तकेसुध्दा वाचनीय आहेत.

आजच्या जगात अस्तित्वात असलेल्या सात आश्चर्याचा थोडासा जरी अभ्यास केला तर असे आढळते की हया गोष्टी आजही आपण करू शकत नाही जेंव्हा की एवढी प्रचंड प्रगती झालेली असूनसुध्दा त्याचे साधे परीरक्षण करणेही किती भारी जाते हे आपण पाहता आहोतच. . उदाहरणार्थ इजिप्तचे पिरॅमीड जरी विचारात घेतले तरी त्याचे अभ्यासावरून असे आढळते की पिरॅमीडच्या उंचीवर जो दगड पिरॅमिड बांधतांना उपयोगात आणला असेल तेवढा दगड त्या उंचीवर नेण्यासाठी आजही तेवढी क्रेन आजच्या प्रगत युगात उपलब्ध नाही. तसेच पिरॅमिडची उंची व पाया यांचे गुणोत्तराचा संबंध पृथ्वी व सूर्य यांचे अंतराशी जुळत असल्याचे आढळून येते. याचा सरळ सरळ अर्थ असा होतो की आपल्यापेक्षा कदाचीत पूर्वीच्या कल्पात जास्त प्रगत मनुष्य अस्तित्वात असतील तसेच सध्याच्या संशोधनानुसार त्यांचे भौगोलिक ज्ञानसुध्दा जास्त होते असे वाटायला लागते. उदाहरणार्थ पृथ्वी व सूर्य

यामधील जे अंतर आपल्या पूर्वीच्या वेद वाड.मयामध्ये दर्शविलेले आहेत तीच अंतरे आज विज्ञानाने यंत्रांच्या सहाय्याने शोधून काढलेली आहेत. याचा स्पष्ट अर्थ असा होतो की ऋषीमुनींनी केलेल्या मानसिक अभ्यासावरून निघालेले तर्क आजच्या विज्ञानाच्या प्रगतीनुसारसुध्दा योग्यच होते व ते विज्ञानाशी जूळतात याचे आश्चर्य वाटते. पूर्वीच्या धार्मिक वाड. मयामध्ये पुष्पक विमानासारखे उल्लेख आढळत असून कशावरून ते परग्रहावरून येणाऱ्या तबकडया नसतील असे कधी कधी मनाला वाटते त्या दृष्टीने उपरोक्त लेखकाने संशोधनात्मक अभ्यास त्याचे पुस्तकात केलेला आढळतो आजच्या विज्ञानाच्या प्रगतीनुसार ब्रम्हांड हे अजूनही बाळ अवस्थेत असून ही सृष्टी विस्तारत असल्याने काळाची सुरूवात व अंत नेमका केंव्हा होईल हेसुध्दा सांगता यायचे नाही. ईतर ग्रहावर देखिल अनेक ठिकाणी अशा तऱ्हेची प्रगती संभवते. कदाचीत यापेक्षाही जास्त प्रगती झाली असल्याचे नाकारता येत नाही. या विश्वातील प्रत्येक सूर्यमालेबाहेरील व्यक्ती कदाचीत एकमेकाशी संपर्क करण्याच्या तयारीतही लागला असेल म्हणूनच कदाचीत आपणास एक दोन हजार वर्षापासून काही अनोळखी तबकडया (Unidentified flying objects i. e. UFO)सुध्दा दिसतात. तसेच बमूर्डा ट्रॅंगलसारखी आश्चर्ये अजूनही अनुत्तरीत आहेत. परंतू या विश्वातील अंतरे एवढी लांब आहेत की एकमेकांना संपर्क करण्यासाठी लागणारा कालावधीसुध्दा फार जास्त असल्याचे आढळून आले आहे. सध्या आपण चंद्रावरच्या मोहीमनंतर मंगळाकडे जाण्याच्या प्रयत्नात आहोत. यापूर्वी रशियातर्फे पायोनिअर एफ सारखी यंत्रे १९७० च्या दरम्यान सूर्यमालेच्या बाहेरही पाठविण्यात आली आहे. जी सोलर शक्तीवर चालत असून पुढे पुढेच जात आहेत व आपल्या पृथ्वीवर संदेश पाठविण्याचे कार्य सातत्याने करीत आहेत. सध्या तर शनीच्या अभ्यासाकडेही आपण वळलो आहोत. पण शनी व आपली पृथ्वी यातील अंतर एवढे आहे की प्रती मिनीट ३६००० कि. मी. या वेगाने जरी शनीकडे जायचे ठरविल्यास मानवाला ३०० वर्षे एवढा काळ लागण्याची शक्यता आहे.

आजच्या काळात संगणकाची तर एवढी प्रगती झाली आहे की आपण नॅनो टेक्नॉलॉजीकडे वळलो आहोत. या विज्ञानाच्या प्रगतीमुळें मानव फार सुखी होत चालला आहे. कदाचीत आपली पृथ्वी नष्ट होण्याच्या वेळेपर्यंत एवढे शोध लागतील

की आपण दुसऱ्या कोणत्या ग्रहावरसुध्दा राहायला जावू शकू असे वाटते. मध्यंतरी आपली पृथ्वी २०१३ मध्ये पूर्णपणे नष्ट होणार आहे असा मजकूर प्रसिध्द करण्यात आला होता. याला पूरक असे उल्लेख सहाव्या शतकापूर्वी होवून गेलेल्या नॉस्ट्रॅडॅमस यांचे पुस्तकात असलेल्या असंबंध ओळीवरूनही काढण्यात आले होते. पण काहीअंशी हेसुध्दा खरे वाटते कारण या मार्च २०११ मध्येच आपण जापानमध्ये त्सुनामीद्वारे झालेला महाप्रलय नुकताच पाहला आहे. हळूहळू आपण अंशतः विनाशाकडेच तर चाललो नाही नां असे वाटायला लागते. व यावर नियंत्रण जर मिळवायचे असेल किंवा पूर्वसूचनेच्या दृष्टीने आजची वैज्ञानिक प्रगतीच आपल्याला उपयोगाची पडेल असे वाटते. ईश्वर जर जगाचा नियंता आहे तर असे वारंवार कां घडते याचे मानवास आश्चर्य वाटत राहते. मानव हा निसर्गनियमाचा अपमान तर करीत नाही.

आजचा काळ हा निसर्गनियमानुसार बदलत आहे. पूर्वी पृथ्वीवर डायनॉसॉर सारखे प्रचंड आकारमानाचे प्राणीसुध्दा असल्याचे सध्याच्या अत्याधुनिक संशोधनावरून आढळते. हा काळाचा व निसर्गाचा बदल केवळ मानवातच झालेला नसून पूर्ण पृथ्वीवरच झाला आहे. पूर्वी पक्षांच्या जवळजवळ ४००० जाती उपलब्ध होत्या व आज मात्र केवळ ७०० जाती उपलब्ध असल्याचे आढळते आहे. मात्र सागरी संशोधनात तर आजही असे आढळते की अजूनही आपणास जवळ जवळ सहा लाख प्रकारचे सागरी व जमिनीवरील प्राणी असंशोधीत असून माहीत नाहीत. असे आधुनिक शास्त्रज्ञांचे म्हणणे आहे. आजच्या काळातील अत्याधुनिक विज्ञान प्रगतीची आपणास माहिती वाचण्याची आवड असेल तर आजच्या विद्यार्थ्यांनी बीबीसी नॉलेज हे मासिक जरूर व नियमीत वाचावे असे वाटते. या महिन्याच्या मासिकामध्ये मी वाचले आहे की फोटॉन हे लहरीसारखे वागत आहे असे जर असेल व आपण फोटान लहरी अंतराळात पाठवू शकलो तर सूर्यमालेबाहेरही आपणास संपर्क करता येवू शकतो.

हे सगळं सांगण्याचा उद्देश एकच की या मानवी जीवनात अशा प्रगतीसोबत आपली वैचारीक पातळी व मानसिक परिवर्तनाची प्रगतीसुध्दा अत्यावश्यक आहे. विज्ञानाच्या प्रगतीच्या तुलनेत वैचारीक पातळीचा बदल हा

अतिशय कमी प्रमाणात आढळून येतो कारण कोणतीही नवीन बाब आपल्याला लवकर पटत नाही कारण आपल्यावर धार्मिकतेचा पगडा एवढा बसला आहे की ते सोडावयास आपण तयारच होत नाहीत. त्यामुळेच पूर्वीच्या शास्त्रज्ञांना मारण्याचासुध्दा कट करण्यात आला होता असे आपण इतिहासात वाचतो. आपला जन्म हा आपल्या मर्जीनुसार झालेला नाही व मरणसुध्दा आपल्या मर्जीनुसार येणार नाही याची सर्वांना कल्पना आहे. हिंदू धर्मातील पुनर्जन्माच्या कल्पना सत्य आहेत किंवा कसे याबाबत आपणास वाद घालायचा नाही परंतू आहे ते जीवन व्यवस्थित कसे घालविता येईल याकडे लक्ष पुरविणे अत्यावश्यक आहे. बऱ्याच साधूसंत मंडळींनीसुध्दा वर्तमान काळालाच महत्व दिलेले आहे. या काळामध्ये प्रतीक्षण बदल होत असतांना आपण पाहतो तसेच वेळ ही कोणासाठी थांबत नाही याचीसुध्दा आपणास जाणीव आहे. मग अशा वेळी आपला जीवनातील वेळसुध्दा अत्यंत महत्वाचा नाही काय ? सर्वसामान्य माणसांचे जीवन हे फार तर साठ ते सत्तर वर्षे एवढे गृहीत धरले तरी हा वेळ मानवी इच्छा परिपूर्ण करण्यास अत्यंत कमी पडतो. तेंव्हा या जगात वावरतांना प्रत्येकाने किती काळजीपूर्वक आपले जीवन घालविले पाहिजे हे महत्वाचे आहे असे वाटते. या सत्तर वर्षाच्या काळात अर्धे आयुष्य तर मनुष्य झोपण्यात घालवितो. म्हणजेच आपणास सत्तर गुणिला ३६५ बरोबर गुणिला २४ तास बरोबर ६, १३, २०० तास फक्त आयुष्यात मिळतात. त्यातील ३, ०६, ६०० तास वर दर्शविल्याप्रमाणे झोपण्यात जातात. त्यामुळे या उर्वरीत वेळेचा व काळाचा सदुपयोग प्रत्येकाने योग्य पध्दंतीने केला पाहिजे एवढाच उद्देश जरी सफल झाला तरी या पुस्तकाचे सार्थक झाले असे मला वाटेल. . या परिवर्तनशील जगात वावरतांना केवळ एकाच बाबींना गृहीत धरुन चालता येणार नाही तर काळानुसार स्वतःची बुध्दि व तिचा योंग्य वापर करणे हीच खरी काळाची गरज आहे. प्रगती व अधोगती या दोन्ही बाबी एकमेकास पुरक असल्याने व्यस्त प्रमाणात वृध्दींगत होत आहेत. मानवाचा मानसिक परीवर्तनाचा वेग हा विज्ञानाच्या प्रगतीपेक्षा कमी असतो कारण मनुष्य नवीन गोष्टींना एकदम आत्मसात करण्याच्या मनःस्थीतीत नसतो. त्यामुळे माणूस याबाबतीत जरासा पुरानमतवादी (Conservative mind)चा असतो असे म्हणावयास हरकत नाही. कालाय तस्मै नमः करीत आपण आपल्या मानसिक परीवर्तनाचा वेगही

विज्ञानासारखा बरोबरीने ठेवला तर या अस्तित्वावर काही अंशी आजचे विज्ञानही नियंत्रण करू शकेल असे वाटते नाहीतरी मृत्युसारख्या बाबींवर अजूनही मानवाला विजय मिळालेला नाही मग प्रयत्न सूरू ठेवायला काय हरकत आहे असे बुध्दीप्रामाण्यवादी माणसाला वाटणे साहाजिकच आहे. परंतू येथे एक बाब अत्यंत महत्वाची वाटते ती अशी की, विज्ञानाच्या प्रगतीसोबत मात्र मानवी जीवन ज्या काळाच्या प्रवाहामध्ये वाहात आहे त्या प्रवाहात तरी आपण सुखरूप होत आहोत की विनाशाकडे चाललो आहोत या बाबींचा विचारही होणे या ठिकाणी आवश्यकच आहे.

यापुढील प्रकरणात आपल्या जीवनातील दैनंदिन बाबींचे नियंत्रण व त्याचा जीवनात सदुपयोग कसा करून घ्यायचा याचा परामर्श घेण्याचा प्रयत्न करू या.

........................................

# आजच्या दैनंदिन बाबी

लिओ टॉलस्टॉय म्हणतो - या जगात सर्व मंडळी पूर्ण जगाला बदलविण्याचा प्रयत्न करतात पण स्वतःला बदलविण्याचा मात्र कोणीही प्रयत्न करीत नाही... खरच आहे. स्वतःकडे बघण्याची दृष्टी म्हणजेच सिंहावलोकन केल्यास असे आढळून येते की स्वतःची प्रगती म्हणजेच पर्यायाने जगाची प्रगती असते कारण आपण केलेली कामे ही कालांतराने किंवा आपल्या मृत्युनंतर या जगाच्याच उपयोगात येणारी असते. जसे की, प्रत्येक शास्त्रज्ञ त्याचे जीवनकाळामध्ये काही संशोधन करत असतो पण त्याचा जीवन काळ हा अल्प असल्याने त्याचे उर्वरीत काम इतरांना हाती घ्यावे लागते व मगच तो शोध पूर्ण होतो. व नंतर तो मानवी जीवनात उपयोगी पडतो. . . असे म्हणतात की मृत्युनंतर आपले केवळ ज्ञान व कर्म आपल्यासोबत येत असतात. तेंव्हा या जगात वावरतांना ज्ञानाला व कर्माला अतिशय महत्व दयावयास पाहीजे. कारण मनुष्य हा एकच असा प्राणी आहे की त्यास परमेश्वराने म्हणण्यापेक्षा निसर्गाने बुध्दी दिलेली आहे. आणि अशा बुध्दीचा उपयोग झाला नाही तर या जीवनाचा काहीच उपयोग नाही. सर्वसाधारण जीवन जगण्यासाठी मेंदूचा केवळ दोन टक्के वापरच आपण करीत असतो व त्यात आपले भागते बाकी अठ्ठयान्नव टक्के भाग हा अविकसीत असल्याने व त्याचा वापर न केल्यामुळे तो तसाच निरुपयोगी अवस्थेत राहतो. असे म्हणतात की साधूसंताचा बुध्दी वापर हा

जास्त प्रमाणात असतो म्हणूनच ते असामान्य माणसासारखे राग, लोभ, मोह, मद, मत्सर यावर नियंत्रण ठेवू शकतात. यावरचे एक उदाहरण आपणास माहितच आहे की, संत श्री. एकनाथ महाराजांच्या अंगावर एक व्यक्ती शंभर वेळा थुंकला पण त्यांनी त्यांचे रागावर एवढे नियंत्रण ठेवले की त्यांनी वाटल्यास शंभर वेळा आंघोळ केली पण त्या व्यक्तिस दोष दिला नाही. यालाच म्हणतात संत बुध्दि नाही तर याउलट आपण जरासे कोणी काही आपल्यास बोलले तर अतिशिघ्रकोपी होवून जातो.

सर्वसाधारणपणे आपण निसर्गाचे अवलोकन केले असता असे आढळते की, सर्व पक्षी, प्राणी हे पहाटे उठतांना दिसतात. किंबहूना त्यांचे दैनंदिन जीवन पहाटे चालू होते कदाचीत यामुळेच त्यांच्या आरोग्यामध्ये फारसे आजार आढळून येत नसावे. त्यांची दिनचर्या अशी असते की एकतर ते बोलत नसल्यामुळे व फालतू विचारशील नसल्याने त्यांचेत उ त्साह जास्त प्रमाणात आढळून येतो. जसे आपण झाडांचा विचार केला तर दोन झाडे एकमेकाशी कधी तुलना करतांना दिसत नाही म्हणजे त्यांचेमध्ये स्पर्धा नाही. विश्व हे शांत असण्याचं कारणच कदाचीत हे असावे की या विश्वात वैश्विक मन व बुध्दी तर असेल परंतु अहंकार मात्र नाही. उपरोक्त पक्षांच्या किलबिलाटाने आपल्याला सकाळी मात्र जाग येते हे निसर्गाचे उपकारच मानायला हवे. पण सूर्यवंशी मंडळीनी मात्र आपली सकाळ जर पहाटे उठण्यापासून सूरू केली तर निश्चीतच फायदेशीर होवू शकेल. नूकतेच मी रॉबीन शर्मा यांचे ‘ Who will cry when you die ' हे पुस्तक वाचले. विद्यार्थ्यांच्या दृष्टीने त्यातील काही महत्वाच्या बाबीचा येथे उल्लेख करावासा वाटतो. एक तर प्रत्येकाने आपण दररोज ज्यावेळी उठतो त्यापेक्षा किमान अर्धा तास तरी अगोदर उठण्याचा प्रयत्न करावा. व या वेळेचा सदुपयोग अभ्यासासाठी किंवा इतर वाचनासाठी केल्यास तो भविष्य काळात निश्चीतच उपयोगी पडतो. दररोजचा दिवस हा नवीन असतो त्यामुळे दरारोजच्या नियमीत कामाव्यतिरीक्त काहीतरी नवीन गोष्टी अंगिकारल्या तर विशेष असा आनंद मिळतो हा स्वानुभव आहे. या व्यस्त जीवनात वेळ मिळत नाही ही नित्याचीच बाब असून अशी प्रत्येकाचीच तक्रार असते पण जर आवड असेल तर मात्र आपण वेळ हा काढतच असतो. जसे की ज्यास व्यायामाची

आवड असेल तर तो व्यायामासाठी धडपड करतो. असेच संगीत, वाचन, लेखन, अभ्यास, खेळ इत्यादीबाबतीतही घडते. जी गोष्ट सूरूवातीला अगदी लहान स्वरूपात असते तीच गोष्ट पुढे एवढी अवाढव्य होवून जाते की आपले आपल्यालाच नवल वाटते. अशा सातत्य ठेवलेल्या छंदामुळे एकतर जीवनात कंटाळा नावाची बाबच उद्‌भवत  नाही व एखादया नवीन गावात आपणास जर मित्र मिळाले नाही तरी फारसे काही बिघडत नाही. पण मित्र हीसुध्दा सुख व आनंद देणारी असते. याबाबत मला येथे एक संस्कृत सुभाषित आठवते.

अलसस्य कुतो विद्या, अविद्यस्य कुतो धनम्, !
अधनस्य कुतो मित्रः, अमित्रस्य कुतः सुखम् !!

सकाळी उठल्यानंतर आपण साधारण अर्धा तास प्रातर्विधीत घालविला असे गृंहीत धरले तरी नंतरचा अर्धा तास दूरदर्शन पाहण्यापेक्षा वत्तपत्र वाचनात घालविल्यास जगाशी आपला थोडाफार संबंध आल्यासारखे वाटते व आपण दिवसभर मित्रांच्या चर्चेत भाग घेवू शकतो नाही तर त्यांचे तोंडाकडे पाहण्याची वेळ येते. Television is for appearing on, not looking at. असे Noel Coward म्हणतो. दूरदर्शन हे दूरूनच दर्शन घेण्याइतपतच महत्वाचे आहे असे मला वाटते. या दूरदर्शनबाबत हा इडियट बॉक्स असल्याचे बरेच लोकांचे मत आहे. या दूरदर्शनबाबत Frank Lloyed Wright म्हणतो Television is a chewing gum for the mind. मग उगीच यात मन कशाला गुंतवायचे. यापेक्षा सकाळचा उत्तम वेळ हा उत्साहवर्धक असल्याने एकतर तो अभ्यासात घालवावा किंवा ज्यांना अभ्यास नसेल त्यांनी पुस्तक वाचनात घालवावा असे वाटते.

एकदा असाच विचार ५ जानेवारी १९९४ ला माझ्या मनात आला. अर्थात त्यापूर्वीसुध्दा मी विद्यार्थी जीवनापासून वाचत हे करीतच असे. परंतू या विशिष्ट दिवशी असे ठरविले की जीवनात जी पुस्तके यापुढे मी वाचणार त्याची किमान नावे  व ती कोणत्या लेखकाने लिहिली आहेत हे सातत्याने लिहावयाचे. हा उपक्रम मी आज २०११ पर्यंत अखंड १७ वर्षे चालू ठेवला आहे त्यामुळे मला आजही म्हणजे आजच्या तारखेत मी किती पुस्तकांचे वाचन केले हे सांगता येवू शकते. हे सांगण्याचा उद्देश एवढाच की या सतरा वर्षाच्या काळात सातत्य व

चिकाटी मुळे मी ६१८ पुस्तकांचा आनंद घेवू शकलो. ही बाब विद्यार्थी प्रेरणेसाठी मला येथे नमुद करण्यास आनंद वाटत आहे. व त्याचा मला स्वाभिमानही वाटतो आहे.

पुर्वी शाळा कॉलेजांमध्ये ती सकाळची असो वा दुपारची... पीटी नावाचा एक पिरीयड असायचा. सध्या तो पूर्णपणे नष्ट झाला आहे. करीता प्रत्येकाने आपला सकाळचा वेळ हा किमान पंधरा मिनीटे तरी व्यायामात घालविला पाहीजे. हा उपदेश नसून ही दैनंदिन बाब आहे असे समजावे. आता दुपारची सुरुवात ही प्रत्येकाची वेगळी असते. कोणाची शाळा, कॉलेज, कोणाचे ऑफीस तर कोणाचा व्यापार. म्हणजेच प्रत्येक मनुष्य साधारणपणे सहा तास घराबाहेर असतो. यात ऐकणे ही अत्यंत महत्वाची बाब आहे. जे कृष्ण मुंर्ती म्हणतात Listening is an Art. याबाबत विनोबा भावेसुध्दा म्हणत असत की परमेश्वराने आपल्याला दोन कान व एक जीभ दिली आहे तेंव्हा बोलण्यापेक्षा दुप्पट ऐकावे. माझ्या वाचनात एक वाक्य असे आले आहे की Bore is a person who talks when you wish him to listen. त्यामुळे एकाग्रतेने ऐकण्याला अतिशयच महत्व दिले पाहीजे. दैनंदिन जीवन जगतांना रॉबिन शर्मा यांचे पुस्तकातील काही आठवत असलेल्या बाबी सांगून या प्रकरणास संपुष्टात आणतो.

१. पहाटे उठावे, व्यायाम करावा.

२. जाणाऱ्या पैशालाही उत्तम सदिच्छा द्याव्या जेणेकरून तो आपल्याकडे इतर मार्गाने परत येइल.

३. जीवनात तीन गोष्टीला महत्व आहे. १. स्वतःच मुल असणे २. एक वृक्ष लावणे व ३. जीवनात किमान एक पुस्तक लिहिणे.

४. उत्तम सुविचारांचा संग्रह करणे.

५. मुलाबाळांना व कुटुंबास महत्व देणे.

अशा तऱ्हेच्या जवळ जवळ १०१ बाबी त्यांनी विद्यार्थी प्रेरणेसाठी दिलेल्या आहेत त्या दृष्टीने त्यांचे A Monk who sold his ferreri, व who will cry when you die ही पुस्तके वाचनीय आहेत असे मला वाटते.

भारताचे प्रसिध्द पंतप्रधान श्री. नेहरूजींचे चरीत्र वाचनानंतर असे आढळते की ते फक्त चार तास झोप घेत असत. म्हणजेच जीवनाच्या चोविस तासापैकी वीस तास ते जीवनासाठी उपयोगात आणत असत. याचे काही अंशी अवलंबन जरी आपण केले तर बघा जीवनात किती फरक पडतो ते. हे सर्व करीत असतांना आपल्या दैनंदिन जीवनाचा सर्वात महत्वाचा भाग म्हणजे आपल्या मुलांची घडण. त्यामुळे ‘घडण मुलांची या प्रकरणाकडे वळू या.

..................................................

# घडण मुलांची

ठेविले अनंते तैसेची राहावे, चित्ती असू द्यावे समाधान! या झाल्या तत्वज्ञानाच्या गोष्टी. पण आज काळ हा पूर्णपणे बदलला आहे. सध्या स्पर्धा युग सूरू आहे. आणि या स्पर्धेमध्ये आपल्याला किंवा आपल्या मुलांना टिकवायचे असेल तर फक्त समाधान ठेवून काहीच उपयोग व्हायचा नाही. तर प्रत्येक बाबीसाठी अत्यंत धडपड करावी लागते. मुलांना साधे इंग्रजी शाळेमध्ये टाकायचे म्हटले तर इंग्रजी बालवाडीची प्रवेश फी ३०,०००/-चे आसपास रक्कम मोजावी लागते. किंवा शिफारस व लग्गा लावावा लागतो त्यामुळे हया तत्वज्ञानाला धरुन चालले तर आपण टिकू शकणार नाही. आजच्या काळात तत्वज्ञान हे सांगण्यापुर्तेच मर्यादीत ठेवावे लागते.

प्रत्येक मनुष्य हा आपापल्या परीने मुलांसाठी प्रयत्नशील असतोच पण प्रत्येकाला यश मिळत नाही याचे मुख्य कारण असे की या पृथ्वीवर विचाराचे ग्लोबल प्रदुषण झाले आहे. जो तो स्वार्थी झाला आहे. व अशा काळात जगायचे तर काहीसे सामान्यासारखेच वागावे लागते. वेळ प्रसंगी आपल्याला काही बाबी पटत नसूनसुध्दा त्याचा आधार घ्यावा लागतो. मग ते चांगले असो वा वाईट.

आपल्या मुलांना मराठीमध्ये शिकवा असे म्हणणारे महाभागच स्वतःच्या मुलांना इंग्रजी शाळेमध्ये टाकतांना दिसतात. म्हणजेच अशा स्पर्धा युगात आपली इच्छा असो वा नसो सहभागी व्हावे लागते ओशोंच्या पुस्तकात मी एके ठिकाणी असे वाचले की हा निसर्ग नेहमी शांत असलेला आढळतो कारण तो एकमेकाशी स्पर्धा करतांना कधीच आढळत नाही. परंतू स्पर्धा व तुलना हया अहंकारातून निर्माण झालेल्या असतात. व या गोष्टी फक्त मानवातच आढळून येतात त्यामुळेच कदाचीत संघर्ष हा मानवातच आढळून येत असावा.

१९६५ ची ही गोष्ट आहे. मी एक सामान्य प्राथमिक शिक्षकाचा मुलगा आहे. व माझे त्यावेळचे शिक्षणही मराठीमधून व खेडयातून झाले आहे. त्यावेळी अचानक महाराष्ट्र शासनाने महाराष्ट्रात चार प्रमुख विभागाकरीता चार अशा पब्लीक स्कूल केवळ ग्रामीण विद्यार्थ्यांकरीता काढण्याचे योजले होते. स्पर्धा परीक्षा हा त्यावेळचा पहिलाच प्रयोग असल्याने कोणत्याही प्रकारचे स्पर्धा परीक्षेसाठी पुस्तक त्यावेळी उपलब्ध नव्हते. विदर्भ विभागातून केवळ ३० विद्यार्थी शासनास पाहीजे होते. परीक्षा प्रत्येक जिल्हयाच्या ठिकाणी होणार होती. एका जिल्हयातून साधारणपणे दोन हजार विद्यार्थी परीक्षेस बसतील असा अंदाज होता. म्हणजेच विदर्भातील त्यावेळच्या आठ जिल्हयातून १६००० विद्यार्थी असे गृहीत धरले तरी त्यात ३० मध्ये क्रमांक मिळविणे ही अशक्यप्राय गोष्ट होती त्यामुळेच की काय जेंव्हा मला या स्पर्धा परीक्षेसाठी माझ्या वडिलांनी बसविले तेंव्हा सर्व शिक्षक या माझ्या वडिलांच्या निर्णयाला हसले होते. पण काय आश्चर्य की माझा त्यात नंबर लागला. हे सांगण्याचा उद्देश एवढाच की कोणत्याही स्पर्धा परीक्षेला बसतांना चुकूनही असा विद्यार्थ्यांनी अंदाज बांधू नये की आपला त्यात नंबर लागणार नाही. यामुळे आपली हिंमत व उत्साह कमी होतो व आपल्यापासून यश दूर पळू लागते. सर्व विद्यार्थी हे सारखेच असतात. प्रश्न असतो तो केलेला प्रयत्न व योगायोग. विद्यार्थ्यांना स्पर्धेत यश मिळवायचे असेल तर अभ्यासामध्ये ही वेडेपण स्विकारावे लागते. ॲरिस्टॉटल म्हणतो - There is no genius without madness. आई वडिल आपापल्या परीने प्रयत्नशील असतातच पण विद्यार्थ्यांनी मात्र अतिशय उत्साहाने प्रयत्न करावा तरच यशाचे शिखर गाठता येवू शकते. मेरी ॲलनचे एक वाक्य आहे

- A lot of people never use their initiative because nobody ever tells them to. त्यामुळे पुढाकार घ्यावा हे आजच्या विद्यार्थ्यांना आवर्जून सांगावे लागते. व हेसुध्दा सांगायला पालकांजवळ वेळ नसतो ही एक आश्चयाची बाब आहे.

सर्वसाधारणपणे असे आढळते की मुलगा जेंव्हा लहान असतो तेंव्हा त्याची घडण ही त्याची आईच घडविते कारण बापाला फारसा वेळच मिळत नसतो. म्हणूनच मुलांनी आई वडिलांचे स्मरण किंवा त्यांचे उपकार कधीच विसरु नये असे सर्वच मंडळी सांगतात पण हे तत्वज्ञान नव्हे तर ही सत्य बाब आहे. अशा या मातापित्यांचे स्मरण आयुष्यात विद्यार्थ्यांनी कां करावे यासाठी मी येथे पुर्विच्या शास्त्रातील भक्त वामनांचा श्लोक देत आहे. ते म्हणतात. -

मातापितरौ साक्षात् प्रजापतिसमौ भुवि !<br>
प्रेमैक्यशांतिसंयोगात् सुप्रजा जायते खलु !!

याचा अर्थ असा की ' मातापिता हे स्वतःच्या मुलामुलींना घडविणारे या भूतलावरील स्वयं साक्षात् प्रजापति म्हणजे ब्रह्मदेवच होत. त्यांच्या अनन्य प्रेम ऐक्य शांतियुक्त संयोगाने, त्यांना स्वतःच्या इच्छेप्रमाणे जशी पाहिजे तशी उत्तमात उत्तम दिव्य संतति निश्चितच प्राप्त होते असा संतान शास्त्राचा पूर्ण अनुभवसिध्द ठाम सिध्दांत आहे. हा संदर्भ स्वामी शिवानंदाच्या 'जीवनाचा सदुपयोग' या पुस्तकातून मुद्दाम विद्यार्थ्यांसाठी घेतला आहे. हे मातापिता लहान मुलांवर कसा संस्कार करतात किंवा कसा करावयास पाहिजे हे बघू.

लहान मुलांचा मेंदू हा एखाद्या कोऱ्या पाटीसारखा असतो आपण त्यावर जे कोरू तेच त्यास माहीत असते. याचा अर्थ असाही नाही की त्यास बुध्दी नसते. मनुष्य हा बुध्दीचा महासागर आहे फक्त प्रश्न असतो तो या महासागराचा शोध घेण्याचा. लहान मुलांवर झालेले संस्कार हे आपल्याला वृध्दापकाळ सुखाने जगण्यास कारणीभूत होवू शकतात. अन्यथा पश्चाताप करण्याची वेळ येते. आजकाल काळाच्या या बदलामुळे काही विचित्र बाबी पहावयास मिळतात. सर्वांनाच आपल्या मुलाबद्दल प्रेम असते पण त्याचा इतका अतिरेक आढळून येतो की त्यांचे वाजवीपेक्षा जास्त लाड झालेले आढळून येतात. पूर्वीच्या काळात आपल्याला जसा

वडिलांचा धाक वाटत होता तसा आजच्या मुलांना वाटत नाही. म्हणजेच वयाची तफावत ही अजिबात आढळून येत नाही. पूर्वीची मंडळी म्हणायची की बापाची चप्पल मुलांच्या पायात फीट होत असेल तर आपला मुलगा बापाच्या बरोबरीचा झाला. तेंव्हा तो मुलगा बापाएवढा जरी भासत असला तरी त्यास आपण मूलच आहेत हा आभास पालकांनी वारंवार दयायला पाहीजे. या बाबी कटाक्षाने पाळल्या पाहिजे. हे पुस्तक उपदेशात्मक करण्याची माझी मुळीच इच्छा नाही. पण फक्त काळाच्या या ओघामध्ये या जगात वावरतांना या बाबी मला महत्वाच्या वाटतात. केवळ सहा वर्षाच्या मुलांच्या हातात मोबाइल व मोटरसायकल सारखी यंत्रे देण्यापेक्षा त्यांना संगणकावर आधुनिक शैक्षणिक सीडीच्या माध्यमातून अभ्यास करावयास लावणे ही काळाची गरज आहे असे मला वाटते. माझा दोन वर्षाचा मुलगा मोबाइल हाताळतो हे सांगण्यास आज बरे वाटते पण कालांतराने तो त्याचा किती दुरूपयोग करेल ही बाब अतिशयच गंभीर आहे. आजचा काळ हा माहिती तंत्रज्ञानाचा असून निरनिराळया विश्वकोशाच्या सिडीज मार्केटमध्ये उपलब्ध आहेत त्याचा पुरेपूर फायदा घेतला पाहीजे. त्या मुलांसाठीच नव्हे तर आपल्यासुध्दा अतिशय उपयोगाच्या आहेत असा माझा स्वानुभव आहे. रॉबर्ट फ्रोस्ट म्हणतो- Education is the ability to listen to almost anything without loosing your temper or yourself confidence.

विद्यार्थ्यांनी मात्र एक गोष्ट जरूर लक्षात ठेवावी व ती म्हणजे - Risk ! Risk anything ! Care no more for the opinion of others for their voices. Do the hardest thing on the earth for yourself. Act for yourself. Face the truth. आजच्या काळात वावरतांना एवढे जरी आकलन झाले तरी पुरे असे वाटते.

आजच्या काळात मुलांना घडवायचे म्हणजे नेमके काय करायला पाहिजे याबाबत मी माझा या ठिकाणी अनुभव कथन करतो. मला पहिली मुलगी आहे. तिला मी काळाच्या ओघानुसार इंग्रजी शाळेमध्ये टाकले होते. तिला इंग्रजीचे आकलन लवकर होत नव्हते. त्यासाठी माझी पत्नी अतिशय परिश्रम करीत होती पण मी इंजिनियर असूनसुध्दा तिच्यासाठी माझा फारसा वेळ देवू शकत नव्हतो. कारण

त्यावेळी माझ्याकडे टनेल कंस्ट्रक्शनचा चार्ज होता व ते ठिकाणसुध्दा शिक्षणाला अनुकूल असे नव्हते. मी ताबडतोब अकोला येथे शहरात जावूनसुध्दा निर्णय बदलविला व तिला मराठीमध्ये प्रवेश दिला. याचा अर्थ मुलांना जर एखादी गोष्ट जमत नसेल तर त्यांना उगीच भार देण्यातही काही अर्थ नाही असे मला वाटते. तिला मराठी माध्यमातून शिकविल्यानंतरसुध्दा तिने यशाचे शिखर गाठलेच व ती अर्थशास्त्रात पारंगत झाली. याउलट माझ्या दुसऱ्या मुलाला इंग्रजी शाळेतील प्रगती पाहून व त्याच्या आईच्या संगोपनामुळे तो दहावीतच काय  पण बारावीतसुध्दा गुणवत्ता यादीत आला तसेच उत्तम संस्कारामुळे व योग्य लक्ष दिल्याने तो आज टाटा रिसर्च डिझाईन ॲण्ड डेव्हलपमेंट सेंटर, पुणे येथे सिस्टीम इंजिनिअर म्हणून कार्यरत आहे. सांगण्याचे तात्पर्य एवढेच की आजच्या जगात वावरतांना मुलांची घडण ही महत्वाची बाब आहे. कारण मी माझ्या डोळयाने पाहले आहे काही जणांकडे पैसा असूनसुध्दा तो खर्च होवू नये या दृष्टीने स्वतःच्या मुलांकडे नकळत दुर्लक्ष करतात. याबाबत शेक्सपियर म्हणतो- It is a wise father that knows his own child. त्यामुळेच  अशा बाबी टाळल्या जाव्या एवढाच या लेखाचा उद्देश आहे. येथे एक नमूद करावेसे वाटते की आजच्या संगणक व इंटरनेटच्या युगामध्ये मुलांची ज्ञानवृध्दि झपाटयाने होत असली तरी ती बिघडण्यासही फारसा वेळ लागत नाही त्यामुळे स्वतःच्या मुलांवर अनावश्यक आत्मविश्वासही कामाचा नाही असे वाटते. आता मुलांच्या या घडण प्रक्रीयेत मानवी मनाचे किती महत्व आहे हे पुढील प्रकरणात थोडक्यात पाहू. परंतू याबाबत माझे मत जरा वेगळेच आहे तेंव्हा आपण पुढे सहमत राहालच याची खात्री देता येत नाही.

..................................................

# मानवी मन

वैश्विक मनाचा जर आपण विचार सोडला तर प्रत्येक माणसाला मन असते. व हे मानवी मन अत्यंत विचित्र आहे. या मनावर आजच्या काळाचाही परीणाम होत असतो. या मनावर आतापर्यंत अनेक संशोधने व प्रयोग झालेले आहेत. तसेच असंख्य पुस्तके या जगात उपलब्ध आहेत. मन हे रहस्याने परीपूर्ण भरलेले आहे. सिग्मंड फ्राईड म्हणतो समुद्रात जसा हिमनगाचा ९० टक्के भाग पाण्याखाली असतो त्याप्रमाणे मानवी मनाची अवस्था असते. थोडक्यात आपल्याला जाणवणाऱ्या मनापेक्षा अनेक पटीने मनाचा भाग आपल्याला अज्ञातच असतो. त्यात तीन थर आहेत असे फ्राइडचे म्हणणे आहे व त्या तिन्ही स्तरावरील घटनांची सरमिसळ व्होवून आपल्याला स्वप्न पडत असतात. अगदी लहान मुलाचा जर विचार केला तर मुलांचे मन ही एक रिक्त पाटीच असते. त्यास अज्ञानी न म्हणता अजाण असे म्हणता येईल. कोणतीही नवीन बाब या मनाला शिकवितांना आजच्या काळाचा विचार होणे आवश्यक आहे. पूर्वीच्या रूढी व परंपरांना धरून चालता येणार नाही. कारण  काळ हा इतक्या झपाटयाने बदलत चालला आहे की या मनाच्या गतिविधीसुध्दा बदलविण्याची वेळ आली आहे. जूने विचार जून्या संस्कृती या जशाच्या तशा पाळल्याच पाहिजे असे बंधन या मनाला नको या मताचा मी आहे. लहान मुलांना घडविण्याची जबाबदारी आपण मागील प्रकरणात पाहिलेलीच आहे, पण त्यांचे मनावर नेमके कोणत संस्कार टाकावे हे आपणच ठरवायला हवे. काळाच्या बदलामुळे जुन्या पिढीत व नवीन पिढीच्या विचारात नेहमीसाठीच तफावत ही राहाणारच आहे. म्हणजेच त्यातून सुवर्णमध्य काढणे ही काळाची गरज आहे.

मानवाच्या आशा आकांक्षा, वासना विकार, सुख-दुःख, हयात सत्तावीस युगे उलटूनही फरक पडलेला नाही. याचा अर्थ मानवी मनातील प्रधान मूल्ये कायम राहतात. याचा परीणाम असा होतो की जीवनासंबंधीचे जे महत्वाचे प्रश्न आहेत जसे की खरे समाधान कसे व कोठे मिळेल, जीवनातील दुःखाला जबाबदार कोण, दुष्टांचा नायनाट केंव्हा व कसा होईल, मृत्युनंतरचे विश्व कसे असेल इत्यादी प्रश्नांची उत्तरे शोधण्यातच मानवी मन अनादी काळापासून सतत भटकत आहे. अशा तऱ्हेने हे शाश्वत जीवन अखेर संपुष्टात येते.

मानवी मेंदूमध्ये मन असावं व मन हे सतत कशाच्या तरी विचार प्रवाहामध्ये असतं हे सर्वांना माहीत आहे. पण याची निर्मीती कशी होत असावी याबाबत प्रत्येकास औत्सुक्य आहे. अनुभव, स्मरणशक्ती, ज्ञान, विचार व कृती हा कदाचीत क्रम असावा असे वाटते. तत्पूर्वी मन हे व्यक्तीमध्ये की विश्वात याबाबत पूर्वीच्या रूषी मुनींनी यावर बरेच संशोधन करून भारतीय मानसशास्त्र जवळपास वेदकाळातच तयार केलेले आहे. हा काळ कदाचीत चार ते पांच हजार वर्षापूर्वीचा असावा असे वाटते. त्यातील लिखित स्वरूपात असा 'पातंजल योग दर्शन' हा ग्रंथ इ. स. पूर्वी साधारणपणे ६०० च्या काळात मोजक्याच सूत्रामध्ये उपलब्ध आहे.

सध्याची वैज्ञानिक प्रगती लक्षात घेता, मानवाचा बुंध्दयांक हा वाढलेला आहे तसेच जसजसा काळ बदलतो तसे वाड. मय व विचारही बदलतात आणि बदलत्या विचारांवर पूर्वपरंपरांगत मतांना प्रमाणवाक्य समजणं हे फारसं संयुक्तीक वाटत नाही. तेंव्हा त्याचा सारासार विचार  हा वैज्ञानिक कसोटीवर तपासण्याचा अधिकार प्रत्येकास असतो व त्यातूनच मानवी जीवनविषयक योग्य निष्कर्ष काढायचा असतो. हीच या शाश्वत जीवनाची काळाची गरज होय अशी माझी धारणा आहे. काळ बदलला तरी जीवन मूल्ये बदलत नाही म्हणूनच सजीव प्राणी सतत सुख व आनंदाच्या शोधात अविरत प्रयत्नशील असतांना दिसतात. हया मूल्यांनाच कदाचीत तत्व असे म्हणत असावे. तत्व हे सर्वसामान्याच्या बुध्दी पलिकडचे असल्याने त्याला भौतिक व प्राकृतिक नियम लागत नाही अशा मूल्यांवर प्रयोग करता येंवू शकतात पण त्यास भौतिक साधने उपयोगास पडत नाहीत. व

मानसिक साधनेला या कलियुगात एवढा वेळ प्रत्येकाजवळ तरी उपलब्ध नसतो. त्यामुळेच ईश्वरत्व या गुणावर केवळ विश्वास व श्रध्दा ही ठेवावी लागते. मी येथे ईश्वर या शब्दाऐवजी ईश्वरत्व हा शब्द वापरला आहे. तेंव्हा ईश्वर कोठे कसा वगैरे प्रश्नांना आधिच बगल देत आहे. कारण माझी दृष्टी केवळ वैज्ञानिक असून मला फक्त मानवी विकासास उपयुक्त अशा बाबींचाच उल्लेख करावयाचा आहे.

आपल्या अध्यात्मिक शास्त्रांमध्ये पिंडी ते ब्रहमांडी असे म्हटलेले आहे म्हणजेच या विश्वाचे किंवा या सृष्ट जगाचे प्रामुख्याने दोन भाग पडतात. एक आंतविश्व व दुसरे बाहय विश्व. आंतरीक मन व वैश्विक मन ( Cosmic mind) प्रथम सृष्टी निर्मीती किंवा व्युत्पत्तीबद्दल थोडक्यात वैज्ञानिक दृष्टीकोन व नंतर अध्यात्मिक शास्त्रिय दृष्टीकोन तपासून पाहू. या सृष्टीला निर्मीती हा शब्द योग्य वाटत नाही कारण ही कोणी निर्माण केलेली नसावी ही फक्त अस्तित्वात आहे याला प्रारंभ व अंत नसावा असे वाटते. There is no creator but the creation is in existence. क्रियेशन म्हणजे सृष्टीचे सृष्ट होणे. ही एक केवळ आपोआप होणारी घटना होवू शकते. असा बिग बँग थिअरीनुसार वैज्ञानिक दृष्टीकोन आहे. अशाच अर्थाचा उल्लेख सांख्ययोग दर्शनामध्येसुध्दा दिलेला आहे.

वैश्विक मनाबाबत मी फारसे आपणास सांगू इच्छित नाही पण एवढे मात्र निश्चित आहे की या विश्वाला काही नियम आहेत व यामागे निश्चीतच एक कॉस्मिक माइंड असावे असे वाटते. त्यामुळेंच हे विश्व नियमाच्या आदेशाचे पालन करीत असतांना दिसते. विज्ञानाच्या विकासाचा व संशोधनाचा मात्र एकच उद्देश आहे तो असा की मानवाला सुख मिळावे. विज्ञान हे गरजेतून निर्माण झाले परंतू सृष्टी ही शब्द, स्पर्श, रूप, रस, आणि गंध यापासून निर्माण झाली असे म्हणतात. विज्ञानाच्या नियमानुसार Gross can be converted in to subtle hence it's volume increases accordingly. म्हणजेच स्थूल वस्तूंचे रूपांतर जल व जलचे वायुरूप रूपांतरण होतांना त्याच्या आकारमानात प्रचंड वाढ होते. यावरून हे स्पष्ट होते की मनाचा आकार हा आकाशापेक्षाही मोठा असतो

त्यामुळेच त्यास चंचलता हा गुणधर्म असावा. पृथ्वी, आप, तेज, वायू व आकश या पंचत्त्वाची आपणास जाणीव आहे व या पंचतत्वाचे पलिकडे अजून तीन महत्वाची तत्वे आहेत व ती म्हणजे मन, बुध्दिव अहंकार. मनाच्या चंचलतेमुळे ते एका ठिकाणी स्थिर राहू शकत नाही करीता मनाच्या द्वारे ज्ञान प्राप्त करण्यासाठी एकाग्रतेचे विशेष असे महत्व आपल्या ऋषी-मुनींनी वेळोवेळी सांगितलेले आहे. या मनाच्या एकाग्रतेने माणसाला ज्ञान प्राप्त होते. शरीराच्या मेंदूमध्ये मन आहे म्हणून त्याला आंतर्मन किंवा अंतःकरण असे म्हणतात. भावना हया पूर्वानुभवाशी, अचेतन मनामध्ये जोडलेल्या असतात त्यामुळेच विचार हा गतानुभामुळे निर्माण होत असतो. या विचारातून इच्छा व इच्छेतून कृती कर्म हा अधोक्रम व उर्ध्व क्रमामध्ये मन एकाग्रता बुध्दी, अहंकार निर्मूलन व नंतर आत्मानंद समाधी व शेवटी वैश्विक एकत्व दृष्टी असा समावेश होतो.

योगवसिष्ठमध्ये अंतःकरण मनचतुष्टयः! असे म्हटले आहे. याचे चार भाग मन, बुध्दी, अहंकार, व चित्त. मन आणि चित्त समानार्थी वाटत असले तरी फरक आहे. असा उल्लेख भगवतगीतेमध्येसुध्दा प्रामुख्याने सहाव्या अध्यायात ध्यानयोगात आढळतो. भारतीय षड्दर्शने व त्यातील पातंजल योगदर्शन हयालाच भारतीय मानसशास्त्र असे म्हणतात. याबाबत जिज्ञासूंनी केवळ एकदा कृष्णाजी केशव कोल्हटकर यांचा हा विस्तृत ग्रंथ वाचून काढावा किंवा श्री. शंकर वामन दांडेकरांची ज्ञानेश्वरी एकदा तरी अवश्य वाचावी त्यात सहाव्या अध्यायात ध्यानाविषयी सविस्तर लिहलेले आहे. . सध्याचे सांप्रत मानसशास्त्र म्हणून विलीयम जेम्स, स्टाउट, मॅकडुगल, सिग्मंड फ्राइड, ॲडलर, युंग, वॉटसन, वुडवर्थ, मर्फी, थॉर्नडाईक असे महाव्यासंगी अभ्यासक गेल्या दोनशे वर्षापासून या मानवी मनाचा अभ्यास करीत आहेत. त्यातील प्रमुख सिध्दांत हा डार्विनचा उत्क्रांतीवाद हा अतिशय प्रचलीत आहे. पण अलिकडे हयासुध्दा वादाला आव्हान देणारे विलीयम जेम्स हे मात्र स्वतःच्याच व्याखेला धरून आहे. ते म्हणतात- मानसशास्त्र केवळ वर्तनाचे शास्त्र नसून ते मानवाच्या जाणिवेचे शास्त्र आहे. अर्थात अंतिम जाणिव म्हणजे Realisation of God. वास्तविक प्रत्येकाची जाणिव ही वेगळी वेगळी असते. प्रत्येकाचा अनुभव हासुध्दा वेगळा असतो. मग यावर विश्वास कसा ठेवायचा.

मानवी मन हे भावनात्मक असते. डेकार्टसच्या मते भावना हया सहा प्रकारच्या असतात. आश्चर्य, प्रेम, घृणा, वासना, आनंद आणि दुःख. या सर्व भावना बौधिकतेच्या निदर्शक आहेत. याचे स्पष्टीकरण करतांना डेकार्टसने म्हटले आहे की, एखादी वस्तू प्राप्त झाल्यावर ती किती सुखकारक वाटेल यावर प्रेमाची अनुभूति अवलंबून असते तर त्या वस्तूच्या प्राप्तीमुळे होणाऱ्या पीडेंच्या अनुभवामुळे घृणेची अनुभूति निर्माण होइल. म्हणजे या ठिकाणी प्रत्यक्ष अनुभवच असावा लागतो असे नसून त्या विषयीचे अनुमान देखिल पुरेसे होवू शकते. मात्र लायबनिट्झ म्हणतो- सर्व शारिरीक क्रियांचे स्पष्टीकरण भौतिक कारणातूनच केले पाहिजेव मानसिक क्रियांचे स्पष्टीकरण मानसिक कारणातूनच केले पाहिजे. शरिरावर कोणत्याही प्रकारे प्रभाव न टाकता आत्मतत्व आपले कार्य स्वतंत्रपणे करीत असते. पाश्चात्य लोक मन Psyche या ग्रिक शब्दालाच आत्मा मानतात. ते भारतीय तत्वज्ञानानुसार संयूक्तिक वाटत नाही. मानवी मनाची ऐतिहासिक पार्श्वभूमी पाहल्यास असे आढळते की, प्राचीन मानव आत्मतत्व (आत्मा) म्हणजे शरिराची छाया अथवा मनुष्य झोपी गेल्यानंतर त्याचे शरीर सोडून जाणे आत्म्याला शक्य असते. शरीर जरी मृत झाले, तरी आत्मा जिवंत राहतो, अशा तऱ्हेची पूर्विची समजूत होती.

या मानवी मनात संकटकाळात नेहमी येणारी संकल्पना म्हणजेच ईश्वर किंवा ईश्वरत्व या बाबतीत आजच्या काळात किंवा या जगात वावरतांना या बाबीला किती महत्व द्यायचे हे पुढील प्रकरणात थोडक्यात पाहू.

.......................................

# ईश्वरत्व

सध्याच्या अत्याधुनिक संगणक युगात ईश्वर किंवा ईश्वरत्व हया गुणाबाबत चर्चा किंवा लिखाण करणे म्हणजे एक प्रकारचे थोतांड (Sophistry)आहे. व हा एक वेळ खावू खेळ आहे असे आजच्या पिढीला वाटणे साहाजिकच आहे. कारण सध्या कलियुगाचा प्रभाव आहे. युग कोणतेही असो पण सुख तर प्रत्येकालाच हवे आहे नां ! जीवनाचा आनंद ही मानवाची पहिली गरज आहे ती अन्न, वस्त्र व निवाऱ्याच्याही आधिची आहे. ही सत्यता आहे व म्हणूनच मनुष्य आयुष्यभर धावपळ व धडपड करतांना दिसतो. मग या जीवनात आनंद मिळविण्यासाठी तो राग, व्देष, लोभ, मोह, मद, मत्सर या षड्रिपूचाही आधार घेण्यास मागे पुढे पहात नाही. मग जीवन कोणत्याही टोकास जावो.  ईश्वर ही संकल्पना आहे असे जरी मानले तरी या संकल्पनेमुळे व मनातील भितीमुळे माणूस आचार संहिता शिकतो. तरीसुध्दा एक गोष्ट येथे प्रामुख्याने सांगाविशी वाटते की या संकल्पनेच्या पोटी माणूस श्रध्देकडून अंधश्रध्देकडेसुध्दा नकळत वाहत गेला आहे हे सत्य स्विकारावे लागते. जुन्याच रूढी व परंपरांना एवढा चिकटून बसला आहे की कधी कधी असे वाटायला लागते की हे अंधश्रध्दापण कधी संपणार आहे. सर्व धार्मिक ग्रथामध्ये पुरोहीतांपासून तर ब्राम्हणापर्यंतच्या संस्कृत जाणणाऱ्या विद्वानानी धार्मिक पुस्तकांमध्ये त्यास जे वाटेल त्यानुसार स्वतःच्या पोटापाण्यासाठी अनावश्यक बदल केलेले आढळतात. व सर्वसामान्य माणसे तीच री ओढत असतात. तेच मंत्र तेच पूजापाठ स्वतःची जरासीही बुध्दि वापरून पुढील पावले टाकीत नाहीत. बर्ट्रँड रसेल म्हणतो - जर प्रत्येक कार्याला कारण असेलच तर मग ईश्वरालाही कारण असले पाहिजे. आणि कोणत्याही कारणाशिवाय जर कार्य असेल तर जग हेच ईश्वर होय. म्हणून ईश्वर आहे किंवा नाही या वादाला वैधता नाही.

एकदा मी प्रवास करीत होतो. प्रवासी बस एका मार्णा नदीच्या पुलावरून जात होती. एका ब्राम्हण व्यक्तिने एक कपडयात बांधलेली पुरचुंडी न सोडता नदीत फेकून दिली. मला आश्चर्य वाटले की यात काय असावे. म्हणून मी विचारले ...त्याने मला उत्तर दिले की त्यात आठ दहा छोटी धार्मिक पुस्तके आहेत.... मग तुम्ही ती नदीत कां फेकली ...तेंव्हा तो म्हणाला. . अहो त्यात काही अर्थ आहे कां ? त्यामुळे आमच्या घरीसुध्दा विनाकारण माझी बायको व्यस्त राहते...पण मी म्हटले आपण तर ब्राम्हण दिसता...मग काय झाले ब्राम्हणालाच माहित असते त्यात काय आहे ते. या घटनेने माझ्या डोक्यामध्ये काय प्रकाश पडायचा तो पडला.

ईश्वर हा शब्द तत्वज्ञानांतील आहे. मी एका पुस्तकामध्ये या तत्वज्ञानाची विनोदी व्याख्या वाचली आहे. जगद्विख्यात बंगाली शास्त्रज्ञ प्रा. मेघनाथ शाह म्हणतात- १. जे आपण स्वतः समजू शकतो पण दुसऱ्यांना समजावून देवू शकत नाही ते अध्यात्म. अर्थात मेटॅफिजिक्स. २. जे आपण स्वतः समजू शकतो व दुसऱ्यांना समजावून देवू शकतो ते भौतिकशास्त्र अर्थात फिजिक्स. ३. जे आपण समजू शकत नाही व दुसऱ्यांनाही समजावून सांगू शकत नाही ते तत्वज्ञान. म्हणूनच आचार्य रजनीशही म्हणतात. Philosophy is a mess of Thinking. तत्वज्ञान हा एक विचारांचा गोंधळ आहे. कारण तो आजच्या काळात खरासुध्दा वाटतो. आपण जर भारतीय षड्दर्शनाचा ओझरता जरी अभ्यास केला तर आपणास असे आढळून येइल की सहा दर्शनशास्त्रापैकी दोन दर्शन शास्त्रे ही निरीश्वरवादी आहेत. पण ती या शाश्वत जीवनाची मूल्ये मात्र शिकवितात. तरीसुध्दा एकदा ईश्वर म्हणजे काय हे वेदान्त शास्त्राच्या अंतिम सिध्दांतानुसार कसा मांडला आहे ते थोडक्यात पाहू.

सुप्रसिध्द आद्य श्रीमत् शंकराचार्य सुमारे सातशेव्या शतकात होवून गेले. त्यांनी केवळ बत्तीस वर्षाच्या आयुष्यात ब्रम्हसूत्र भाष्यासारखे महान ग्रंथ निर्माण केले. अपौरूषेय अशा वेद, उपनिषद वाड. मयाचे ते गाढे अभ्यासक होते. त्यांच्या मूळ टिक्का टिप्पणी केवळ संस्कृत भाषेमध्ये उपलब्ध आहेत. वेदान्त

शास्त्राच्या अंतिम सिध्दांत श्रीमदशंकराचार्यांनी एका श्लोकार्थात येणेप्रमाणे मांडला आहे.

श्लोकार्थेन प्रवक्ष्यामि, यदुक्तं ग्रंथकोटिभिः !
ब्रम्हसत्यं जगन्मिथ्या, जीवो ब्रम्हैव नापरः !!

हा सिंध्दांत जिज्ञासूंच्या गळी उतरविण्यासाठी वेदान्त शास्त्राने जी उपपत्ती मांडली आहे तिच्यात दोन भाग पडतात. एक अध्यारोपात्मक व दुसरा अपवादात्मक. अध्यारोपात्मक भागात वेदान्त शास्त्राकडून जी उपपत्ती मांडण्यात येते ती अगदी थोडक्यात येणेप्रमाणे- (संदर्भ - कृष्णाजी केशव कोल्हटकर यांचा १९६० चा पातंजल योगदर्शन ग्रंथ) - सृष्टीचा हा सर्व पसारा मूळ प्रकृतीतून निर्माण झाला आहे. प्रकृती अनादी (आरंभहीन), अनिर्वाच्य (वैखरी वाणीने अवर्णनीय असा) आणि त्रिगुणात्मक(सत्व, रज, तप)अशी शक्ती होय. ही शक्ती चिदानंदमय-ब्रम्हप्रतिबिंबसमन्वित आणि त्रिगुणात्मक असल्याने ते तीन प्रकारांनी अविष्कृत होते. शुध्दसत्वप्रधान, मलिनसत्वप्रधान, आणि तमःप्रधान. हे ते तीन प्रकार होत. यातील. शुध्दसत्वप्रधान प्रकृती हीच माया होय. आणि, मलिनसत्वप्रधान हीच अविद्या होय. आणि मायेत प्रतिबिंबीत जे चैतन्य तोच ईश्वर होय. हया ईश्वराच्या अध्यक्षत्वाखाली मायासंज्ञित प्रकृती चराचर सृष्टी पुनः पुनः निर्माण करीत असते. अविद्येत प्रतिबिंबीत जे चैतन्य तेच जीव होत. मलिनसत्वात देव, मनुष्य हया श्रेणी आहेत. चित्त विकासामुळे मनुष्य जन्म प्राप्त होतो. एवढे जरी हया तत्वज्ञानातून समजून घेतले तरी अध्यात्माविषयी अधिक डोके कूट करण्याची गरज नाही असे मला वाटते.

वरील मूल्यवान अशा तत्वांचा विपर्यास काळानुरूप होत गेला असावा कारण मानव निर्मीतीला जवळजवळ दहा लाख वर्षे झालेली आहेत. हस्त लिखीत मूळ वाड. मय साधारण दोन ते अडीच हजार वर्षापासून उपलब्ध आहे. ते हा विपर्यास कसा होत गेला असेल हे थोडक्यात पाहू. ही मुक्त चर्चा आहे यास आपण सहमत असाल हे माझ्या दृष्टीने महत्वाचे नाही.

मानवाच्या उत्क्रांतीवादाच्या नियमानुसार साधारणपणे पांच ते सहाहजार वर्षापासून मानवी बुध्दीचा विकास झाला असावा, असा मानववंश शास्त्रज्ञांचा पुराव्यानिशी सिध्द केलेला प्रयत्न आहे. सर्वप्रथम पृथ्वीवर उत्तरेकडे ग्रीक

संस्कृंती अस्तित्वात होती असे मानतात. त्यानंतर ते सिंधू खोऱ्यात घुसले व तेथूनच सिंधू शब्दाचा अपभ्रंश होवून हिंदूसंस्कृती जन्माला आली. त्याकाळी राजेशाही असल्याने व एकत्र कुटंबपध्दतीमुळे जे रूषी-मूनी आत्मज्ञानाचा अभ्यास अरण्यामध्ये ध्यानयोगाव्दारे करीत असेल त्यांच्या प्राथमिक गरजा कदाचीत हे राजे मंडळी करीत असावी. या अभ्यासात या विव्दान मंडळींना जे काही स्मृती किंवा श्रुतीव्दारे कळले असेल ते वाड. मय मौखिकरित्या शिष्यांकडून पाठ करवून घेतल्या गेले असावे. असे करवून घेण्यात रूषींचा कोणताही स्वार्थ दिसून येत नाही कारण वाड. मय रूपाने त्यांना काही पैसा मिळत नव्हता. तर त्यांचा उद्देश केवळ लोक कल्याण हाच असावा असे वाटते. यातूनच मूळ चार ग्रंथ जसे वेद निर्माण झाले. हे सर्व अनाहृत नाद ऐकल्याने निर्माण झाले असतील म्हणूनच कदाचीत याला अपौरूषेय असे म्हणून त्यांनी याचे कर्तेपण स्वतःकडे घेतले नसावे. त्यानंतर उपनिषद. उप म्हणजे जवळ व निषद म्हणजे गुढ गोष्ट सांगणे. कारण या सामान्यांना अनाकलनीय असल्याने त्या मंत्ररूपाने सांगितल्या गेल्या असाव्या. कालांतराने या पाठांतराच्या माध्यमातून जवळजवळ पांच लक्ष वेदमंत्र नष्ट झाले असा उल्लेख धार्मिक पुस्तकांमध्ये आढळतो.

मुद्रण व्यवस्था ही फार अलिकडे म्हणजे साधारणपणे इ. स. १४०० चे आसपास सूरू झाली. गुटेनबर्ग याने पहील छापील यंत्र निर्माण केले. व त्यानंतरच हे सर्व जो तो आपापल्या बुध्दीनुसार ग्रंथनिर्मिती करावयास लागला. असे जर झाले असेल तर अनेक प्रकारचे भाष्य निर्माण झाले. याकारणाने चार वेद, जवळजवळ दोनशे उपनिषदे, अठरापुराण, भृगुसंहिता, सुश्रुतसंहिता, योगवसिष्ठ, शुक्रमीती, ब्रम्हभाष्य, ज्ञानेश्वरी, गीता, पातंजलयोगदर्शन, षडदर्शने , मानसोल्लास, विवेकचुडामणी, पाणिनी व्याकरण, चरकसंहिता, धर्मसिंधू आचार संहिता अशा कितीतरी ग्रंथांच्या मुळ हस्तलिखीत प्रंतींवरून ग्रंथनिर्मीती झाली. तसेच पाश्चात्य देशात Old Testament, New Testament, Theosophy, Indology, cosmology, paleonteology, Suphism इत्यादी ग्रंथांमुळे प्रत्येक मानवी गटाने आपापला ईश्वर निर्माण केला. पण ईश्वर असला तरी ती शक्ति एकच असावी असे वाटते. हे सर्व येथे सांगण्याचा उद्देश एकच की या विविध भाष्यांमध्ये ज्यांना

संस्कृत येत होते त्यांनी कशावरून त्यांना जे पाहिजे ते घुसाडले नसावे. कालांतराने हे ग्रंथ इतके फोफाटले की सर्व सामान्य माणसाच्या ते टाळक्याबाहेर जावू लागले त्यामुळेच की काय त्याची एकसारखी री ओढल्या गेली आहे. त्यामुळे नेमके काय झाले की काही साधू संत मंडळींना हे समाज प्रबोधनाचे काम यथोचित करून अंधश्रध्दा निमूर्लन करावे लागले. परंतू यातील महत्वाचा भाग हा आहे की या ईश्वरत्वाचे अवडंबरच फार झाले आहे. ईश्वरावर श्रध्दा असणे अजिबातच वाइट नाही पण त्यात फक्त डोळस वृत्ती असावी किंवा त्याकडे पाहतांना वैज्ञानिक दृष्टीने पहावे. याबाबत राष्ट्रसंत तुकडोजी महाराजांनी लिहिलेली ग्रामगीता अवश्य वाचावी. या ग्रंथाची किंमत शासनाने मुद्दाम फक्त दहा रूपये ठेवलेली आहे. त्यामूळे आजच्या जगात वावरतांना नेमकी कोणती भूमिका स्विकारावी हे अत्यंत महत्वाचे ठरते. व हीच खरी काळाची गरज आहे असे वाटते. दाढी वाढवून भगवे कपडे घातले की कोणालाही महाराव होता येते व थोडेसे धार्मिक पुस्तके वाचली की जन सामान्यांना सहज भुरळ घालता येते हे सध्या जगात आढळून येते या देवाच्या नावावर किंवा फोटोवर आजकाल भिकही मागता येते कारण देवाचा फोटो दिसला की भल्याभल्यांना भिती उत्पन्न होते. जागोजागी दगडाला सिंदूर लावले की आपले हिंदू देव तयार होतात. हे असं किती दिवस खरं मानायचं. खरे पाहिले तर देव जर आपल्या हृदयामध्ये असेल तर या प्रतिमा कशाला असे बरेचदा वाटते असो हा ज्याचे त्याचे श्रध्देचा प्रश्न आहे. सांगायचे तात्पर्य एवढेच की ईश्वरत्व हा गुणधर्म जर आपल्या हृदयात निर्माण होत असेल तर हीच ईश्वराची खरी पूजा होय असे माझे मत आहे.

आता या किचकट विषयाला बाजूला सारून आजच्या जगात या ईश्वराच्या नावावर काय चालले आहे याचा थोडक्यात परामर्श पुढील प्रकरणात घेवू. परंतू हे सर्व आपणास रूचेलच हे सांगता यायचे नाही.

.....................................................

........ .

# श्रध्दा व अंधश्रध्दा

मागील प्रकरणामध्ये मानवी मन व ईश्वरत्व या विषयावर आपण थोडक्यात माहिती पाहली. त्यामुळे पातंजल योगदर्शनच्या ग्रंथानुसार प्रत्येकाने ईश्वरप्रणिधान हे ठेवलेच पाहिजे. परंतू आजच्या जगात वावरतांना असे आढळते की या इश्वराच्या नावावर श्रध्दा ठेवतांना ही श्रध्दा इतक्या टोकास जाते की मनुष्य अंधश्रध्देच्या आहारी कधी गेला हे त्यास कळत नाही. वास्तविक मनुष्य हेच इश्वराचे बीज आहे व त्यास सदसदविवेक बुध्दी निसर्गतःच प्राप्त झाली असतांनासुध्दा त्या बुध्दिचा पूरेपूर वापर न करता जग बदलविणारी माणसे जे सांगतात त्याच्या आहारी सर्वसामान्य मंडळी नकळत जातात. पूर्वीच्या काळात महाराजांची संख्या आजच्या तुलनेत जरा जास्तच होती. यातील बहुतांश महाराज ढोंगी असल्याचे आढळून आले आहे तरीसुध्दा आजही महाराज म्हटले की तेथे विशेषतः स्त्रियांची गर्दी फार आढळते. त्यांना नेमकं महाराजापासून काय मिळतं तेच कळत नाही. आजपर्यंत अवाढव्य संत साहित्य उपलब्ध असतांना त्याचा फायदा न घेता उगीच त्यांच्या मागे लागण्यात काही अर्थ उरत नाही. आंतरराष्ट्रीय किर्तीचे महाराजलोकं मात्र मस्त हेलिकॉप्टरमधून फिरतात. गायवासरूंना जशी मतं मिळत होती त्याप्रमाणे या महाराज लोकांना गर्दी मिळत असते. जे कृष्णमूर्ती म्हणतात कोणताही गुरू दुसऱ्यास विकास घडवू शकत नाही. प्रत्येकाचा विकास हा त्याचे स्वतःचे बुध्दिवर अवलंबून असतो. जे. कृष्णमूर्ती हे जागतिक विचारवंत होते.

मी एकदा शरद बेडेकरांचं ईश्वर विरहीत जीवन हे पुस्तक वाचले. त्यातील मला नेमका मजकूर आठवत नसला तरी मी सध्या त्या पुस्तकाशी बराच सहमत आहे. आपल्या प्रत्यक्ष जीवनात केवळ सदसदविवेक बुध्दी जरी वापरली तरी आपल जीवन आपण व्यवस्थित घालवू शकतो अशी माझी धारणा आहे. उदा. दान देणे ही अतिशय चांगली गोष्ट आहे. ज्यांनी अतिरीक्त धन अतिरीक्त मार्गाने कमविले आहे त्यांनी तर दान हे केलेच पाहिजे. अर्थात त्यामुळे त्यांचे पाप धुतल्या जाणार नाही हे त्रिवार सत्य असले तरी त्यांचे या दान प्रकाराव्दारे गरीबांना मदत होते. परंतू मला या काळात याचे आश्चर्य वाटते की ज्यांचे पायात घालायला चप्पल नाही ती मंडळीसुध्दा मंदिरामध्ये किमान एक रूपयाचे तरी दान करतात, याची काय आवश्यकता आहे. सर्व मंदिरांमध्ये सध्या इतक्या जास्त प्रमाणात दान जमा होते की मला वाटते याचा कालांतराने दुरूपयोग होण्यास वेळ लागणार नाही. आजही खेडेविभागात असलेल्या काही प्रसिध्द मंदिरामध्ये प्रत्येक दिवशी, दानधर्मी लोकांच्या पैशातून मोफत भोजनाची व्यवस्था आहे त्याठिकाणी मी असे पाहले आहे की जवळपासचे खेडयातील मंडळी त्याच गांवात कष्ट न करता त्या मंदिराजवळ मिळत असलेल्या मोफत भोजनाचा दररोज आनंद घेतात हे कितपत योग्य आहे. तसेच एवढे प्रचंड दान व जमा झालेल्या पैशात किमान त्या मंदिराजवळ निश्चितच स्वच्छता ठेवल्या जावू शकते पण असे आढळते की बऱ्याच मदिरात स्वच्छता आढळत नाही या बाबी या काळात तरी योग्य वाटत नाही मग कशाला उगीच अनावश्यक मंदिरे उभी केली जातात हेच कळत नाही. आजकाल तर काही मंडळी घराच्या अंगणातच एखादे साधारण मोठे असे मंदिर बांधतात व तेथे दान पेटी ठेवतात याचा उद्देश काय?एक गृहस्थ तर मला असा आढळला की तो हरे राम, हरे राम असे बकत चक्क गोरखपूर पब्लीकेशन्सची कमी किंमतींची पुस्तके त्यावर जास्त किंमतीचे लेबल लावून विकत होती. याला आपण काय म्हणाल. ही कोणती व्यापाराची पध्दत आहे.

ज्यांना पूर्वी संस्कृत येत होती त्यांनी नको त्या बाबी या धार्मिक ग्रंथामध्ये घुसाडल्या व आता गरीबवर्ग बिचारे स्वतःचे दुःख नष्ट व्हावे या उद्देशाने नको त्या पूजा निढळया घामाचा पैसा खर्च करून करतात. या बाबी तातडीने बंद

होणे आजच्या काळाची गरज आहे. मी नास्तिक नाही परंतू अति आस्तिकतेच्या आहारी जाणाऱ्या मंडळीसाठी माझी कळकळीची विनंती आहे की आपणास खरे अध्यात्म समजून घ्यायचे असेल तर पूजपाठापेक्षा स्वतःचा वेळ सत्कर्मात घालविला तरी ती ईश्वराची सर्वात मोठी पूजा आहे. अकोला येथे एक व्यक्ती आहे मला त्याचे सध्या नांव आठवत नाही. त्या व्यक्तिने खूप अभ्यास करून नागबली सारख्या पूजासुध्दा शास्त्रात कोठेच वर्णिलेल्या नाहीत हे सिध्दा केलेले आहे. तरीसुध्दा आज हजारो मंडळी या पूजा करतांना दिसून येतात. काहींचे म्हणणे असे आहे की आमचा अशा गोष्टींवर अजिबात विश्वास नाही पण कधी कधी मनात असे वाटते की जर काही अघटीत झाले तर काय करता ...करीता आम्ही अशा तऱ्हेच्या पूजा करूनच टाकतो. वास्तविक  हजारो साधूसंतांनी हे समजाविले आहे की मंदिरामध्ये देव नाही तरी आपण हा प्रकार सोडत नाही. या ईश्वराच्या तत्वज्ञानाच्या आकलनासाठी मी चारशे अध्यात्मिक पुस्तकांचे अध्ययन केलेले आहे पण मला अजूनही या जगात आज घडणाऱ्या विचित्र बाबींचे आश्चर्य वाटते. अजूनही कोणास अशीच ईच्छा असल्यास त्यांना मी फक्त पुढील लेखकांचीच पुस्तके  वाचण्यास सांगू इच्छीतो. स्वामी विवेकानंद, यांचे समग्र ग्रंथ, जे. कृष्णमूर्तींचे विचार, ओशोंचे विचार, कृष्णाजी केशव कोल्हटकरांचे पातंजल योगदर्शन व ईतर धर्मांचा आवर्जून अभ्यास. सोप्या भाषेतील ग्रंथामध्ये समर्थांचे दासबोध, राष्ट्रसंत तुकडोजी महाराजांची ग्रामगीता. अशी पुस्तके  किमान दोनदा तरी जरूर वाचावी. अंधश्रध्देबाबत विदर्भाचे संत श्री. गाडगेबाबा यांचे चरीत्राचा अभ्यास करावा म्हणजे कळेल की संत कसे निर्माण होतात. त्यांना त्यांचे जीवनात ज्या अडचणी आल्या त्यातूनच त्यांनी पैशाला हात न लावण्याचा निर्णय घेतला व ते महान संत होवून गेले. आपणास अनेक प्रकारची उदाहरणे सर्वांनाच माहित असल्याने मला ती वेगळे सांगण्याची आवश्यकता वाटत नाही.

मी अमरावतीला असतांना किमान तीन वर्षे योगाचे वर्ग घेतले होते. त्याचा मुख्य उद्देश फक्त स्वास्थ्य सुधार एवढाच होता तरीसुध्दा मला भाग घेणाऱ्या मंडळींनी एवढे सतावले की मला काही योगसिध्दी वगैरे प्राप्त झाली आहे काय? आजच्या जगात वावरतांना समजा तुम्हाला योगसिध्दी प्राप्त ही झाली तर

काय लोकांना लुटायचे आहे हेच मला कळत नाही. तेंव्हा अशा फालतू बाबींकडे अजिबातच लक्ष पुरवायला नको.

अमरावतीला माझा एक मित्र आहे त्याचे नांव विजय. हा प्रायव्हेट व्यवसाय करतो पण याचा छंद असा की स्वतःचे पेट्रोल खर्च करून बऱ्याच शासकीय कार्यालयामध्ये कर्मचाऱ्यांना किंवा कोणालाही अंधश्रध्देवरचे पुस्तक फुकटात वाचावयास देतो. याचा उद्देश एकच की समाज प्रबोधन व्हावे पण समाज प्रबोधन तर होतच नाही उलट याची पुस्तके गहाळ मात्र निश्चित होतात. त्याचेकडूनच मी स्वामी विवेकानंदाचे सर्व ग्रंथ वाचून काढलेले आहेत. दुसरा एक मित्र असा आहे की त्याने तर त्याचेजवळ असलेली सर्वग्रंथसंपदाच मला केवळ वाचण्यासाठी दान केली. हयाचे नांव आहे श्री. प्रकाश . जेंव्हा एखाद्याची बदली होते तेंव्हा आपणास आवश्यक नसलेली ग्रंथ संपदा इतरांना अवश्य वाचण्यास दिली पाहिजे. हेच सर्वात पूण्याचे काम आहे असे मला वाटते. तिसरी आदरनीय व्यक्ती आहे अमरावती येथील वकील श्री. देशपांडे. हे सध्या हयात नाहीत पण यांनी मला मृत्युपूर्वी केवळ पंधरा दिवस त्यांचे जवळील ग्रंथसंपदा देण्याचे कबूल केले होते. त्यानुसार त्यांच्या सुविद्य पत्नीने मला योगी अरविंदाची बरीच पुस्तके हस्तांतरीत केली त्यामुळे याठिकाणी मी या सर्वांचा अतिशय रुणी आहे.

माणूस जर पुस्तकांच्या सानिध्यात राहला तर श्रध्दा व अंधश्रध्देचा फरक निश्चितच जाणवू शकेल. Havlock Ellis म्हणतो- man must not swallow more belief than he can digest. त्यामुळे पुस्तकांशी मैत्री करणे हे विद्यार्थ्यांसाठी व व इतरांनाही अत्यंत जीवनाविषयक व उपयुक्त आहे. आज जर खरोखर वाचायचे असेल तर वाचनाची नितांत आवश्यकता आहे. जसे शरीराला व्यायामाची आवश्यकता आहे त्याचप्रमाणे आपल्या डोक्यालाही काही व्यायाम आवश्यक असेल तर तो म्हणजे ग्रंथ मैत्री पण आजकाल असे आढळते की या दूरदर्शन म्हणजेच या दृक्श्राव्य माध्यमामुळे आपण सर्वच वाचनापासून नकळत दूर होत चाललो आहे. काळ बदलला व माध्यमे नवीन आली तरी वाचन मात्र सोडू नये कारण वाचनाने चांगल्या लोकांच्या विचाराची जाणीव होते म्हणजेच एक प्रकारची चांगल्या लोकांशी मैत्री करण्यासारखे नव्हे काय?

शेवटी एवढेच म्हणावेसे वाटते की या जगात वावरतांना ईश्वरप्रणिधान जरूर ठेवावे परंतू अंधश्रध्देच्या आहारी न जाता व इतरांनाही न जावू देता स्वयंविकासाकडेच आपला कल ठेवावा व होत असल्यास जनकल्याणाचाही विचार करावा. या अंधश्रध्देपोटी कित्यकांचा छळ झालेला आपण पाहतो आहेत. अलिकडच्या दूरदर्शन दृश्यात मी असे पाहले की एक महाराज एका स्त्रिला अत्यंत हाल करून चाबकाने मारत होता. व अशा बाबीकरीता शासन कोणतीही उपाय योजनासुध्दा करीत नाहीत. याबतीत शाम मानवांचे कार्य व त्यांचे वाड. मय वाचनीय व संकलनीय आहेत. या अशा पुस्तकांद्वारे बुवाबाजी, देवी अंगात येणे, भानामती इत्यादी प्रकार अलिकडे जवळपास बंद झालेली आहेत तरीसुध्दा कधी कधी दुःखाने असे म्हणावेसे वाटते की या भोंदूबाबांना बरेचदा राजकीय संरक्षणसुध्दा मिळत असते ही अत्यंत शोचनीय बाब आहे. पुढील प्रकरणामध्ये विकासाच्या दृष्टीने पुस्तकांचं सानिध्य हे सर्वांच्याच कसे उपयोगात येते हे पाहू.

••••••••••••••••••••••••••••••••••••••••••••••••••••••••

# पुस्तकांच्या सानिध्यात

A man is known by the book he keeps. असे म्हणतात. या जगात वावरतांना सर्वात जास्त महत्व कशाला दयावयाचे असेल तर ते पुस्तकांना दयावे या मताचा मी आहे. सर्वसाधारणपणे प्रत्येक पालक आपल्या मुलांना त्यांचे वयाच्या तिसऱ्या वर्षापासूनच आजकाल शाळेमध्ये घालतात. म्हणजेच याचा अर्थ १० अधिक २ अधिक ४ बरोबर १६ वर्ग प्रत्येक विद्यार्थी शिकतो असे गृहीत धरले तरी त्याचे साधारण १६ गुणिला ६ विषय असे ९६ पुस्तकाचे वाचन त्याला करणे अनिवार्य ठरते बाकी चे वाचन हे अवांतर वाचन प्रकारात मोडते. सध्याच्या हया माहिती युगामध्ये आपल्या जगात १० कोटीचे आसपास ग्रंथ निर्मीती झालेली आहे. नुकत्याच मी वाचलेल्या रिडर्स डायजेस्ट नोव्हेंबर २०१० पृष्ठ क्र. ३० वर असा उल्लेख छापलेला आहे की येत्या २०१३ पर्यंत इंटरनेटवरील वाचक अंदाजे २९० लक्ष पुस्तकांचे डाउनलोड करणार आहेत. आपले सरासरी आयुष्य सत्तर वर्षाचे गृहीत धरले तर आपण किती पुस्तकाचे वाचन करू शकतो हे थोडक्यात पाहू. तत्पूर्वी एक मात्र सांगावेसे वाटते की इंटरनेटवर जर अशा सुविधा उपलब्ध आहेत तर याचा लाभ सर्वांनीच घ्यावयास पाहिजे. मी तर १९९८ पासून सुमारे ५००० चे आसपास पुस्तके इंटरनेटवरून डाउनलोड केलेली आहेत. ती प्रत्यक्षात मी जरी वाचू शकलो नाहीत तरी ती पुस्तके माझ्या पिढीसाठी मात्र भविष्यात नक्कीच उपयोगी पडू शकतील असे मला वाटते.

माझ्या माहिती व अनुभवानुसार व वाचनाच्या प्रचंड आवडीच्या आधारे मी असे ठामपणे सांगू शकतो की, एका वर्षात माणूस कितीही व्यस्त असला तरी तो रोज सरासरी पाच पानाचे वाचन नक्कीच करू शकतो. पांच गुणिला तीस एकशे पन्नास पानाचे एक पुस्तक असे गृहीत धरले तरी एका वर्षात बारा पुस्तके सरासरी

वाचून होतात. याचा अर्थ आपण सत्तर वर्षाच्या आयुष्यात सुरूवातीचे वीस वर्षे सोडूनही दिली तरी पन्नास वर्षात पन्नास गुणिला बारा बरोबर सहाशे पुस्तके आरामात वाचून होतात. व एवढे वाचन पुरेसे आहे. त्यानंतर वेळ वाचलाच तर आपण उत्तम प्रकारचे लिखाण ही करू शकतो. असे म्हणतात की माणसाने किमान एक पुस्तक तरी आयुष्यात लिहिले पाहिजे म्हणजे आपण जो जन्म घेतला तेंव्हा आपल्याला जगाला जे सांगावयाचे आहे  ते सांगितल्या जाते. व या जन्माचे काहीना काहीतरी सार्थक झाल्याचे समाधान लांभू शकते. यासाठी आपण फार महान व्यक्ति असलो पाहिजे हेसुध्दा तितके महत्वाचे नाही. कारण सर्वसामान्य माणसेच कालांतराने महान होत असतात. उपरोक्त प्रमाणे मी प्रयोग केलेला आहे व माझी सहाशे पुस्तके मात्र ईश्वरकृपेने केवळ सतराच वर्षात वाचून झालेली आहे. म्हणूनच मी हा लिखाणाचा दुसरा प्रयत्न करीत आहे. ही बाब केवळ विद्यार्थ्यांना प्रेरणा मिळावी याकरीताच उल्लेखिलेली आहे. यात मला अहंकार नसून स्वाभिमान वाटत आहे. आता कोणते वाचन केंव्हा व कसे करावे याबाबत थोडेसे.

विद्यार्थी जीवनात थोडसं हलकंफुलकंच वाचन करावं कारण अभ्यासामुळें जो नकळत ताण येत असतो तो घालविणे हाच वाचनाचा उद्देश ठेवला तरी चालेल. या दृष्टीकोनातून प्रसिध्द लेखकांच्या कथा, कादंबऱ्या, जमल्यास काही नाटके, व आवड असल्यास तांबे, कुसुमाग्रज, कवि बी, सुरेश भट इत्यादींच्या कवितांची पुस्तके वाचावीत. या वयात मराठीसोबत हिंदीतील वाड. मय जसे हिंदी कादंबऱ्या व हिंदीतील प्रेमचंदसारख्या लेखकांच्या कथा इत्यादीचे वाचन करावे. वयाच्या एकविस ते तीसच्या दरम्यान ऐतिहासिक पुस्तके, दर्जेदार लेख संग्रह, दैनंदिन वृत्तपत्र इत्यादीची सवय करावी. तीसनंतर जागतिक पातळीवरची पुस्तके, वैज्ञानिक माहितीपर पुस्तके उदा. निरंजन घाटे, जयंत नारळीकर, स्टीफन हॉकींग व जास्तीत जास्त चरीत्र वाचन करावे. या वयात क्लासिक्स वाचायला हरकत नाही पण ते समजण्यास थोडे अवघड असल्याने मी तरी याबाबत फारसा अडून बसत नाही कारण बरेचसे क्लासिक्स हे डोक्यावरून जातात. मी फक्त इंग्रजी साहित्याचा अभ्यास करतांना असे साहित्य वाचले होते. क्लासिक्सच्या बाबतीत मार्क ट्वेन म्हणतो- Classic : A book which people praise and don't read.

त्यामुळे हा ज्याचे  त्याच्या आवडीचा वैयक्तिक प्रश्न आहे. चरीत्र वाचन हे सर्वांसाठी अतिशय उपयुक्त असते कारण चरीत्रातून प्रत्येक महान व्यक्तिचे  जीवन कसे घडत गेले याची कल्पना येते. तसेच अशा उमेदीच्या काळात विकासात्मक पुस्तके जसे की मार्क व्टेन, डेल कार्नेजी, रॉबीन शर्मा यांची पुस्तके वाचावीत. रॉबीन शर्माच्या पुस्तकात मी एक अशी युक्ती वाचली की ते म्हणतात. पुस्तक वाचतांना घेतले की प्रथम तीन प्रकरणे जर आपल्याला आवडली नसतील तर ते पुस्तक उगीच जबरदस्तीने वाचण्याचा प्रयत्न करू नये. यामुळे एकतर आपल्या वेळेची ही बचत होते व आपण अनेक पुस्तकांचे वाचन एकाच वेळी करू शकतो. उपरोक्त काही महत्वाच्या पुस्तकांची यादी अर्थात फार थोडक्यात देण्यात आली आहे. चाळीस नंतर सर्व प्रकारच्या धार्मिक पुस्तकांचे वाचन करून काही प्रकारचे टिपणसुध्दा करण्याचा प्रयत्न करावा. माझे मोठे बंधू स्व. श्री किशोर राऊत यांनी संपूर्ण आयुष्य अगदी मजेत घालविले पण मृत्युपूर्वी त्यांना काय वाटले कोणास ठावूक पण एक अतिशय असा संक्षिप्त धार्मिक संग्रह केला आहे.

ॲरिस्टॉटल याने या जगात सर्वप्रथम विश्वकोशाची कल्पना मांडली होती त्यामुळे सर्व विश्वकोश संदर्भ म्हणून चाळण्यास हरकत नाही. याव्यतिरीक्त एक अतिशय महत्वाची बाब अशी की सर्वांनीच स्वतःचे आपल्या आवडीच्या पुस्तकांचे एक समृध्द असे ग्रंथालय तयार करावे. अर्थात ही जरी सध्या खर्चिक बाब वाटत असली तरी कालांतराने तुम्हास लक्षात येइल की आपण फार स्वस्त किंमतीत पुस्तके घेतलीत. माझ्याकडे तर १९६० पासून अशा प्रकारचा संग्रह केलेला आहे. सध्या माझ्या वैयक्तिक ग्रथालयात जवळजवळ एक हजाराचे वर पुस्तके आहेत. पण मी सरकारी नोकरीत असल्याकारणाने मला बदलीच्या वेळी बरीच मासिके वगैरे सोडून देतांना अतिशय दुःख होत असते. माझा वैयक्तिक स्वभाव असा आहे की माझे एखादेवेळी पैसे हरविले तर मला काहीच वाईट वाटत नाही पण जर माझे कोणी पुस्तक जर परत केले नाही तर पैसे हरविण्यापेक्षाही मला फार वाईट वाटते. एकदा मी माझ्या नोकरीच्या काळामध्ये १९८० ला मराठी विश्वकोश घ्यायचे ठरविले होते त्यावेळी त्याची किंमत केवळ ७० रूपये प्रति खंड अशी होती पण त्यानंतर मला तो योग कधीच आला नाही आज त्याच खंडांची किंमत ३०० रूपये आहे. ३००

रूपयामध्ये महाराष्ट्र शासन एक हजार पानाचे विस्तृत पुस्तक उपलब्ध करून देते परंतू  कोणीच त्याची दखल घेत नाही. आजच्या जगात वावरतांना मला आढळलेली ही शोकांतिका आहे असे वाटते.

पैशाचा अपव्यय न होता वाचनाचा छंद कसा जोपासावा याबाबत मला माझे अनुभव येथे सांगणे अत्यावश्यक वाटते. १९७२ ला मी केवळ १७ वर्षाचा होतो. पण त्यावेळी मला पुस्तके वाचनाचा छंद पूर्ण करायचा होता परंतू घरची परिस्थीती फारशी चांगली नसल्याने मी पुस्तके विकत घेवू शकत नव्हतो. अशा वेळी काय करावे हा प्रश्न मला नेहमी भेडसावत असे. त्यामुळे सर्वात स्वस्त अशी एक लायब्ररी जी एक मुस्लीम व्यक्ति हातगाडीवर चालवायचा, ती मी लावली. त्यात मात्र केवळ हिंदी पुस्तकेच मिळत होती. मला वाटले चला कमीतकमी हिंदी पुस्तके तर वाचून होतील. अशा प्रकारे त्यावेळी मी गुलशन नंदा, रानू, ओमप्रकाश शर्मा, सुरेंद्र माहन पाठक, प्रेमचंद अशा कितीतरी लेखकांची पुस्तके वाचून काढली. सांगायची गंमत अशी की मला त्यावेळी एक पुस्तक वाचण्याकरीता २५ पैसे प्रतिदीन द्यावे लागत असे. त्या घाईने मी एकाच दिवसात एक पुस्तक पूर्ण कसे वाचून होइल हा प्रयत्न करीत असे म्हणजे माझे २५ पैसे वसूल झाल्याचा आनंद गगनात मावेनासा होत होता. काही कां असेना छंद तर पूर्ण होत होता यातच मला समाधान वाटायचे. त्यानंतर मी नेहमी हे बघत असे की स्वस्त काय मिळेल तर मला फक्त गोरखपूर येथील धार्मिक पुस्तके त्यादृष्टीने बरी वाटायची. हळूहळू पुस्तकांचा संग्रह करण्याचा छंद लागला. काही काळानंतर अकोला येथे बाबूजी वाचनालयाचा मी सदस्य झालो व माझी पुस्तके वाचण्याची तळमळ तेथेच पूर्ण झाली असे म्हणावयास हरकत नाही. कारण ते आजही जगाच्या इतिहासातील सर्वात स्वस्त वाचनालय आहे कारण तेथे वाचनालयाची फी वर्षाला केवळ पांच रूपये अशी आहे. वास्तव, आपण तेथे जावून आजही बघू शकता.

आज काळात एवढा प्रचंड बदल झाला आहे की एखाद्याला जर खरोखर पुस्तकांची आवड असेल तर त्यांनी इंटरनेटच्या माध्यमातून पुस्तके शोधावीत. असंख्य पुस्तके इंटरनेटवर डाउनलोडसाठी मोफत उपलब्ध आहेत. या दृष्टीने मार्गदर्शन करावेसे वाटते की विद्यार्थ्यांनी www. gutenberg. org ही

वेबसाइट बघावी म्हणजे आपणास जवळजवळ दोन लाख पुस्तके मोफत डाउनलोड करावयास मिळू शकतील. याशिवाय गुगल साइटवर जाऊन फ्री बुक्स असे जरी टाईप केले तरी आपणास पुस्तकांच्या बाबतीत बरीच मदत मिळू शकते. तसेच सध्या बऱ्याच विश्वकोशांच्या सीडीज उपलब्ध आहेत त्याचा अवश्य लाभ घ्यावा. आजकाल तर शैक्षणिक सीडीज इतक्या उपलब्ध आहेत की पालकांनी त्या अवश्य आपल्या पाल्यांना परिचीत करून द्यावयास हव्यात. आजच्या जगात वावरतांना ही मला अत्यंत मोलाची बाब वाटली म्हणूनच मी याचा या प्रकरणात उल्लेख केलेला आहे.

एकदा जर असा पुस्तके वाचण्याचा छंद आपणास जडला की मग आपण नकळत दूरदर्शन सारख्या इडियट बॉक्स पासून अलिप्त राहू शकतो. त्यावर मनोरंजन म्हणून काही पहावयाचे असेलच तर डिस्कव्हरी, ॲनिमल प्लॅनेट, डिस्कव्हरी सायन्स किंवा संगीताचे व फक्त विनोदाचेच कार्यक्रम बघावेत अन्यथा सिरीयल पाहण्यात तर काहीच अर्थ नाही त्यापेक्षा तर आपल्या जीवनावर काही लिहिले तर ते तरी चांगले या मताचा  मी आहे. एक लेखक तर असा म्हणतो की माझी एक कादंबरी वाचून होत पर्यंत एक कादंबरी लिहून पूर्ण होते. या लेखकाचे नेमके मला आता नांव आठवत नाही पण सांगण्याचा आशय आपल्या लक्षात आला असेलच. वाचनाने आपली बोलण्याची शैलीसुध्दा बदलते. या ओरेटरीबाबत मिस्टर चॅटफिल्डचे एक वाक्य मला आठवते - Oratory is the power to talk people out of their sober and natural opinion.

चांगली पुस्तके गोळा करतांना एकच तत्व लक्षात ठेवावे की ते जरी सध्या महाग वाटत असले तरी कालांतराने तेच पुस्तक आपणास स्वस्त भासू लागते. आपल्या मराठीच्या जगतात मराठी पुस्तके फार महाग आहेत याचा मला कधी कधी अतिशय राग येतो याउलट इंग्रजी पुस्तके इतकी स्वस्त आहेत की इंग्रजी पुस्तके घेण्याचा मोह लवकर होतो. हे धोरण जर बदलेले तर आपला मराठी वाचक ही उच्च शिखर गाठू शकतो. आणि जर कदाचीत तुम्हाला ते वाचण्यास वेळ जरी मिळाला नाही तरी ते किमान तुमच्या पुढील पिढीस निश्चितच उपयोगी पडू शकते. मला पुस्तके घेण्याची आवड असल्याने मी पान, सिगारेट याबाबी टाळून पैशाची बचत करतो व कारण मला हे माहीत असते की आपली बरीच मित्रमंडळी ही या पान,

सिगारेटमध्ये किमान ३०० रूपये महिना व्यर्थ घालवित असते. आपणही अशा प्रकारच्या सवयी टाळून हा एक नवीन प्रकारचा छंद बाळगावा या इच्छेनेच हे व्यक्त केलेले आहे. वास्तविक मी काही फार मोठा लेखक नाही की या क्षुल्लक बाबीचा आपणास उपदेश करावा पण मला असे वाटते की यातून आजच्या पिढीचा विद्यार्थी हा या काळाच्या ओघात भरकटत जावून अतिरीक्त सवयीच्या आहारी जाण्यापेक्षा यातून त्यास थोडी जरी प्रेरणा मिळाली तरी माझ्या या पुस्तकाचे सार्थक होईल एवढीच इच्छा बाळगतो. वास्तविक पुस्तक सानिध्य हा माझा अतिशय आवडीचा विषय म्हणावयास हरकत नाही. पुस्तकाचे मला एवढे वेड आहे की मी बाजारातून पुस्तके आणली की प्रथम ती डायरेक्ट ऑफीसमध्ये कपाटात लपवून ठेवतो म्हणजे मला घरच्या यथोचित मिळणाऱ्या शिव्यांपासून तात्पूरती मुक्ति मिळते. आता माझे वय पंचावन्न झाले असल्याने मला जगाला काहीतरी उगीच सांगायची ईच्छा झाली म्हणूनच हा उपद्व्याप सुरू आहे बरं या उपद्व्यापासाठी मी इंजिनिअर असूनसुध्दा मराठी टायपिंग आत्मसात केले. करीता याचा थोडातरी विचार करून आपणही उत्तम पुस्तकांचा संग्रह करावा अशा तऱ्हेचा संग्रह काही श्रीमंत व्यक्तिंकडे नेहमी आढळतो पण तो संग्रह त्यांचे शोकेसच्या शोभेसाठी त्यांनी केलेला असतो, याउलट आपल्या सारखी सामान्य माणसे आर्थिक भारामुळे पुस्तके घेण्याची आपली तीव्र इच्छा पूर्ण करू शकत नाही तरीसुध्दा काही संग्रह निश्चितच करावा असे वाटते. ज्यांना ग्रंथसंग्रहाबद्दल विशेष असे काही वाचायचे असेल तर त्यांनी यु. पी. इंगोले यांचं ग्रंथवेडे आंबेडकर हे पुस्तक अवश्य वाचावे. त्यात असे दिले आहे की डॉ. आंबेडकर हे पुस्तकांसाठी एवढे वेडे होते की एखादे पुस्तक फारच आवडत असेल तर ते जवळ बाळगण्यास स्वतःजवळच ठेवून घेत असत. वाचनालयास वापस करीत नसत. डॉ. राम शेवाळकर सारख्या साहित्यीकांजवळ तर त्यांचा संग्रह दहा हजाराचे वर आहे असे मी वाचले आहे. आपणही पुस्तकांचा संग्रह करावा ही आशा बाळगून हे प्रकरण येथे थांबवितो.

.................................................

........

# इंटरनेटचं महत्व

आज विज्ञानाची एवढी प्रचंड प्रगती झाली आहे की, या जगातील सगळयात महत्वाचा शोध कोणता असेल तर तो म्हणजे संगणकीय इंटरनेटचे जाळे. १९७० च्या दरम्यान संगणक साधारण चौथ्या पिढीत आले तेंव्हा संपूर्ण जगाचा व्यवहार केवळ सहा संगणकाच्या माध्यमाने होइल असा अंदाज होता. पण अलिकडच्या तीन दशकांमध्ये झालेल्या प्रगतीवरून असे आढळते की, संगणकाची वाढ एवढी प्रचंड झाली आहे की, जवळजवळ प्रत्येकाच्या घरीच संगणक आले आहे किंबहूना असे म्हणावेसे वाटते की मोबाइलच्या माध्यमाद्वारे प्रत्येकाच्या, संगणक तळहातावर आलेले आहे. हे दृष्टीस पडते. जगातील सर्व संगणक अलिकडे इंटरनेटच्या जाळयाने जोडली गेली असल्याने या युगाला इंटरनेट युग असे किंवा माहिती तंत्रज्ञानाचं युग असे म्हटले तरी अतिशयोक्ति होणार नाही. एवढी या संगणकाची महिमा आहे.

श्रीमद्‌भगवद्‌गीतेमध्ये अध्याय चार मधील ३८ व्या श्लोकामध्ये असे म्हटले आहे की, ''न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते. '' याचा अर्थ असा की, या जगात ज्ञानासारखे पवित्र असणारे खात्रीने दुसरे काहीही नाही. व असा हा ज्ञानाचा पसारा आज प्रत्येकाच्या तळहातावर आला आहे. ही आश्चर्याची बाब आहे. इंटरनेटच्या या जगात सर्वांचा प्रवेश होणे आजच्या काळाची गरज आहे. इंटरनेटवर तर पुस्तकांचा विचार केला तर एका महासागराएवढे भांडारच पसरले आहे. त्यामुळे किमान मोफत असणाऱ्या गोष्टी तरी आत्मसात करण्यास काय हरकत आहे. पूर्वी

ख्रिश्चन धर्माने त्यांचे धर्म प्रचाराकरीता मोफत पुस्तके वितरीत केली होती. तसेच आपल्या गोरखपूर संस्थेनेसुध्दा हिंदू धर्माची अनेक पुस्तके अल्पकिंमतीमध्ये वितरीत केली आहे. ही सर्व चाळण्याची कोणास इच्छा असल्यास अशा प्रकारची सर्व पुस्तके इंटरनेटवर www. cincinnatitemple. com या वेबसाइटवर मोफत डाउनलोडसाठी उपलब्ध आहेत. पण या सर्वांच्या वाचनानंतरसुध्दा सर्व प्रकारचे निर्णय आपण आपलेच घ्यावे या मताचा मी आहे.

इंटरनेटने एक प्रकारचा जगातल्या माहितीचा गौप्यस्फोटच केला आहे असे वाटते. विकी लिक्स ही एक अशी वेबसाइट आहे की स्विस बँकेसारखा डेटा त्यांचे कडे उपलब्ध आहे. या सर्व महत्वाच्या बाबींमुळे आपण आपल्या ज्ञानकक्षेत बऱ्याचे गोष्टीचे आकलन करू शकतो. व अशा पध्दतीने आपला जीवनकाळ आनंदाने घालवू शकतो. आजकालचे विद्यार्थी इंटरनेटचा वापर करतात पण जरा वेगळयाच पध्दतीने. ते विशेषतः आर्कुटवर किंवा काही चॅटींग संदर्भात अगदी वेडे होवून जातात हे योग्य नाही त्यापेक्षा चांगल्या गोष्टीकडे कल ठेवावा अन्यथा या माहितीच्या पुरामध्ये त्सुनामी सारखे तात्काळ नष्ट व्हाल. गुगल हे सर्च इंजिन सर्वात प्रचलीत असून त्यात सुमारे कोटीच्या पटीत वेब पेजेस उपलब्ध आहेत. व ते ही सेंकंदाचे अवधित पहावयास मिळतात. आजकाल विंडोज मोबाईल फार प्रचलीत झाले आहेत. ते कमी अधिक प्रमाणात महागडे असले तरी या महीण्याच्या म्हणजेच मार्च महीण्याच्या चिप या मासिकामध्ये मी असे वाचले आहे की सर्व प्रकारचे विंडोज मोबाइल सध्या रूपये २००००/- चे आंत मिळतात. व आजचा सर्व सामान्याचा पगार लक्षात घेता ही बाब काही महागडी नाही असे वाटते.

याव्यतिरीक्त संगीत, कला, लेखन अपलोडींग, आपलं मत इत्यादी सर्व काही आपण इंटरनेटच्या माध्यमाचा वापर करून उपयोग घेवू शकतो. त्यामुळे आजच्या जगात वावरतांना या अत्याधुनिक सुविधांचा प्रत्येकाने पूरेपूर फायदा घ्यावा असे वाटते. इंटरनेटमुळे सर्व जग आपल्या घरात काय पण तळहातावर आलं आहे. याचा सदुपयोग व्हावा, हीच सदीच्छा!

..............................................

# मित्र-मंडळी

या जगात वावरतांना मित्र मंडळीची निवड करण्याचे आपल्याला पूर्ण स्वातंत्र्य लाभलेले आहे. ते नातेवाईकाप्रमाणे रक्त संबंधाचे नसतात. Alphonse Karr म्हणतो- Every man has three characters -that which he exhibits, that which he has, and that which he thinks he has. त्यामुळे असे मित्र नको की जे दर्शवितात, मी चांगला आहे किंवा असेही नको की जे विचार करतात की मी चांगला आहे तर असे हवेत की जे खरोखर चांगले आहेत. सर्वांना हे माहित आहे की जो कठीण प्रसंगाच्या वेळी कामास येतो तोच खरा मित्र पण आजकाल किंवा आजच्या जगात असे फार कमी मित्र आढळून येतात. मित्रांशिवाय जीवनात सुख मिळत नाही या अर्थाचे एक संस्कृत सुभाषित मी मागील प्रकरणात सांगितलेलेच आहे. त्यात मात्र धनवान माणसांनाच मित्र लवकर मिळतात या आशयाचे ते आहे व आपण तर सर्वसामान्यांमध्ये मोडतो. तेंव्हा

आपल्यासारख्यांना मित्र मिळविणे हीसुध्दा या जगात वावरतांना एक कलाच मानली पाहिजे.

माझा मुलगा पूणे येथे सिंहगड इंजिनिअरींग कॉलेजला असतांना तो आवर्जून विदर्भातला असला तरी विदर्भाच्या मुलांसोबत राहात नसे याचे मूळ कारण त्याने तेथे विदर्भातील मुलांची बोलभाषा व पूणे किंवा इतर प्रदेशातील मुलांचे टॅलेंट याचा अभ्यास केला व त्यानंतरच मित्रांची निवड अशी केली की जे त्यास भविष्याकरीता उपयोगी पडू शकतात. अर्थात या त्याच्या निवड प्रक्रियेमुळे त्यास चारही वर्षात भरघोस यश मिळत गेले व तो अशा हूशार मुलांच्या संगतीने स्पर्धा करून अभ्यास  करून चारही वर्षात पहिल्या तीन क्रमांकात उत्तीर्ण होत गेला. माझे वडिल माझ्या लहानपणी असे म्हणायचे की आपल्याला आपली शक्ति वाढवायची असेल तर आपल्यापेक्षा दुप्पट ताकतीच्या माणसाशी लढत दिली पाहीजे त्याचप्रमाणे येथे असे गृहीत धरावे की आपली बौधिक क्षमता वाढवायची असेल तर आपणास आपल्यापेक्षा दुप्पट हूशार व्यक्तिशी संपर्क करावयास पाहिजे. हेसुध्दा येथे सांगण्याचा उद्देश एवढाच आहे की आजकाल विद्यार्थ्यांनी आपली मित्रांची आवड व निवड कशा तऱ्हेने उपयोजित करावी.

असाच प्रकार काही मुलींच्या बाबतीतही मुलींनी स्विकारावा म्हणजे चांगल्या मुलींच्या सोबत जीवनाची पाउलवाट सुयोग्य पध्दतीने पुढे चालत राहते. मित्र मंडळींची निवड ही विद्यार्थी जीवनातील अत्यंत महत्वाची बाब आहे कारण हेच जीवन असे आहे की त्यांना त्यांचे जीवन घडवायचे असते व नेमके याचवेळी त्यांचे पालक वा वडिल त्यांचे जवळ नसतात. वय कमी असलं तरी आकलन मात्र भरपूर असते तेंव्हा अशा प्रकारची आकलन शक्ति योग्य मार्गाने कशी वापरता येईल हेच या ठिकाणी महत्वाचे आहे. एकदा कां जीवनाची चाकोरी व्यवस्थित झाली की मग कशाही लोकांशी संपर्क आला तरी तो निभावता येवू शकतो. कारण  तेंव्हा विद्यार्थी मानसिक दृष्टया परिपक्व होतात

मोठयांसाठी मात्र ग्रंथ हेच मित्र असावे या मताचा मी आहे. अमेरिकेमध्ये विकासात्मक पुस्तके फार लिहिल्या जातात व तेथे अशा पुस्तकांना प्रतिसादही मिळत जातो पण आपल्या भारतात असा काही उपदेश केला की

सर्वसामान्यांना फार राग येतो कारण प्रत्येकाची अशी समजूत असते की हे आम्हाला कळतेच. या बाबत मला येथे असा उल्लेख करावासा वाटतो की जे कृष्णमूर्तीचे विचार वाचण्यासारखे आहेत. जे कृष्णमूर्तीचे Commentaries on living अशा पांच सहा सिरीज आहेत. त्याचा मराठी अनुवादसुध्दा 'जीवनभाष्ये' असा विमलताई देशपांडे यांचा आहे असे मला येथे आठवते. जीवनभाष्ये या पुस्तकांचे तीन खंड खरोखरच वाचनीय आहेत. ज्यांना इंग्रजी वाचनाची आवड आहे त्यांनी तर जे कृष्णमूर्तीची ओरिजीनल पुस्तकेच वाचावीत असे मला वाटते. जे कृष्णमूर्ती ही जगातील एकमेव अशी व्यक्ती आहे की ज्यांचे लिखाणावर दहा कोटीचे आसपास शब्दरचना उपलब्ध आहे. या विचारवंताने जीवन जगण्याचे खरे तत्वज्ञान सांगितले आहे. तरीसुध्दा शेवटी आपल्या सदसदविवेक बुध्दीला काय पटते तेच महत्वाचे आहे. याबाबत अल्बर्ट आइनस्टाइन म्हणतो- Never do anything against conscience even if the state demands it. हा परीच्छेद ग्रंथ हेच मित्र कसे होवू शकतात या उद्देशाने लिहीलेले आहे.

ज्याप्रमाणे आपण मित्रांची निवड चोखंदळपणे करू त्याचप्रमाणे आपलेही त्यांचेशी वागणे संयुक्तिक असले पाहिजे. अन्यथा सर्व सारखेच होइल. केवळ मित्रांशीच काय पण या जगात आपण जन्म घेतला तेंव्हापासूनच आपले जगाला काही देणे उरते असे म्हणतात. तेंव्हा या जगात वावरतांना वागण्याचे नियम या पुस्तकामध्ये जॉन वेस्ले म्हणतो- do all the good you can / in all the ways you can /in all the places you can /at all the times you can / to all the people you can / as long as ever you can.

ग्रंथ हे जसे आपण चांगले मित्र मानतो त्याचप्रमाणे चांगल्या व्यक्तिंशी सहवास हीसुध्दा एक भाग्याचीच बाब आहे. येथे मला मित्रांच्या बाबतीत नकारात्मक असे काही लिहावेसे वाटत नाही. शेवटी एवढेच म्हणावेसे वाटते की नातेवाईकाच्या तुलनेत मित्र हे केंव्हाही श्रेष्ठच. आजकाल तर नातेवाइक मंडळी अतिशय दूर राहात असल्याने जवळच्या स्थानिक मित्रांची सर्व प्रसंगात फार मदत होते असे आढळते. तसेच मित्र घरी आला की जो मनाला आनंद होतो तेवढा आनंद नातेवाइक आल्यास होत नाही कारण प्रत्येकदा असे आढळते की नातेवाइक मंडळी ही काहीना काही

उद्देश घेवूनच येतात. व त्यांचा तो उद्देश आपण पूर्ण करू शकलो नाही तर मग गैरसमज हे ठरलेलेच असतात. या नाते संबंधाबाबत मी पुढील प्रकरणाकडे वळतो आहेच. तत्पूर्वी एक संस्कृत सुभाषित विद्यार्थ्यांना पाठ करण्याच्या उद्देशाने परत एकदा येथे देतो.

अलसस्य कुतो विद्या, अविद्यस्य कुतो धनम्, !
अधनस्य कुतो मित्रः, अमित्रस्य कुतः सुखम् !!

…………………………………………………………

# नाते संबंध

मागील परिच्छेदामध्ये जसे मित्र आपल्याला मिळविता येतात त्याप्रमाणे ही नातेवाईक मंडळी मात्र मिळविता येत नसून ती योगायागाने घडून येते. एक प्रकारची ती इश्वरदत्त देणगीच होय  कारण जेंव्हा आपल्या मुलामुलींचे लग्न प्रसंगाचे वेळी विशीष्ट योग जुळून येतो त्यानुसार तिकडची सर्व मंडळी आपली नातेवाईक होवून जाते. त्यात आवड निवडीचा प्रश्नच नसतो. ते रक्तांनी संबंधीत होवून जातात. अशा वेळी मग प्रत्येकाला आपापल्या संबंधांना मोठया नाजूकतेने जपावे लागते कारण आपली मुलगी त्या ठिकाणी वावरत असते. अशा नातेसंबंधात जगतांना त्या बाजूचा मान सन्मान हया बाबी ओघाओघाने आल्याच.

जुन्या रूढी व पंरपरानुसार ज्या पध्दती आजपर्यंत चालत आल्या आहेत त्या सध्याच्या काळानुसार आज बदलल्या पाहिजेत असे प्रत्येकाला वाटत असते पण त्या दृष्टीने कोणीही पुढाकार घेतांना आढळून येत नाही. उलट अशा पध्दती अजून वृध्दिंगत होत आहेत व त्याचा तिरस्कार म्हणून प्रत्येक जण या बाबतीत चर्चा करतांना आढळून येतो पण या बाबी थांबविल्या  जात नाही. करीता माझे असे  मत आहे की हळूहळू हा बदल आपण स्विकारला पाहिजे. सर्वच जुन्या रूढी, पूर्वीच्या काळात  पूर्ण केल्या जावू शकत होत्या पण आजच्या  या धकाधकीच्या काळामध्ये ते शक्य होत नाही. पूर्वी दोन गावामधील अंतर अतिशय

कमी असायचे पण आजकाल सोयरिकी या फार दूर दूर होत असतात तेंव्हा प्रत्येक वेळी प्रत्येक प्रसंगाला हजर राहणे शक्य होत नाही. तेंव्हा आजच्या जगात वावरतांना प्रत्येकाने आपली मानसिकता बदलविणे अत्यावश्यक आहे अन्यथा नातेवाईक संबंधामध्ये गैरसमज वाढत जातात व पर्यायाने जो त्रास होतो तो प्रत्यक्षरित्या आपल्याला न होता नकळतपणे आपल्या मुलींना होत असते. याची प्रथमतः जाणीव आपल्याला आपली मुलगी होवू देत नाही ही बाब ती स्वतःच्या सासरकडच्या मंडळींची बदनामी होवू नये या दृष्टीने झाकून ठेवते पण हा मुकाटयाने होणारा त्रास मात्र ती तिच्या जीवनात मूक गिळून सहन करीत असते. तेंव्हा या दृष्टीने प्रत्येकामध्ये मानसिक बदल  होणे ही काळाची गरज आहे असे वाटते.

बरेचदा समाजात वावरतांना नातेवाईक हा दूरचा की जवळचा ही बाब महत्वाची नसून त्यांचेशी आपले संबंध कसे आहेत यावरच बऱ्याच बाबी अवलंबून असतात. मला असे आढळून आले आहे की काही मुलींच्या सासरची मंडळी इतकी सुशिक्षीतांसारखी वागते की ती मंडळी आपल्या मुलीला स्वतःच्या मुलीसारखी वागणूक देते. कारण त्यांनाही एक मुलगी असते. पण ज्यांना मुळातच मुलगी नाही त्यांना मात्र मुलीचे प्रेम हे काय असते याची अजिबात जाणीव नसल्याने ते त्यांचे घरी आलेल्या नवीन सुनेला अतिशय त्रासदायक वागणूक देतात. व अशा बाबतीत त्या घरातील सर्व मंडळी एका बाजूने होते व ही बिचारी मुलगी एकटीच पडते त्यावेळी तिच्या ज्या भावना असतात त्या कल्पना न केलेल्याच बऱ्या. चांगले किंवा वाईट यापैकी कोणते नेमके घराणे आपणास मिळेल याची जाणीव नसल्यानेच कदाचीत मुलगी सासरी जातांना दुःखाचे अश्रू ढाळते. श्रीमंत वर्गामध्ये तर मध्यंतरी  सुनेला जाळण्यापर्यंत बऱ्याच घटना आपण वृत्तपत्रात वाचल्या आहेत. अशा मुलींसाठी माझा असा सल्ला आहे की आज काळाचा बदल लक्षात घेता व आपण स्वतः सुशिक्षीत असल्याने अशा प्रकारचा होणारा त्रास सहन न करता त्यांना प्रथम साम, दाम, दंड, भेद इत्यादी शास्त्रांमध्ये सांगितलेले प्रकार वापरूनही त्यांचेत बदल होत नसेल तर मात्र त्यांना आपल्याच पातळीवर योग्य समज देण्याची क्षमता बाळगली पाहिजे किंवा वेळप्रसंगी त्यांना कायदेशीर बाबींचीही जाणीव वजा धमकी देण्यास हरकत नाही. काळाचा हा बदल त्यांचेही लक्षात यावयास पाहिजे हीच आजच्या  जगात वावरतांना

महत्वाची बाब आहे असे मला वाटते. आजकाल तर बहुतांश मुली या नोकरी वर्गात असल्याने त्यांना या कायदेशीर बाबी समजावण्याचीही गरज राहलेली नाही या जगात आजपर्यंत स्त्रियांवर अन्याय होत आलेला आहे पण यापुढे मात्र या पुरूष प्रधान संस्कृतीमध्ये असे कधीच घडणार नाही असे वाटते व हीच आजच्या जगात वावरतांना महत्वाची बाब आहे.

काही दिवसांपूर्वी मी मातृभूमि वृत्तपत्रांमध्ये मुलांपेक्षा मुली बऱ्या हा लेख दिला होता. मुली या किती चांगल्या असतात याबाबत मला एक 'टी फुलर' या लेखकाचे एक वाक्य आठवते की, My son is my son till he have got him a wife but my daughter is my daughter all the days of her life. कारण की ती तिच्या आयुष्यभर सासरच्या मंडळीशीच नव्हे तर आपल्या आई वडिलांशीसुध्दा प्रेम करीत असते एक प्रकारची मुलगी म्हणजे निसर्गातील अव्याहत वाहणाऱ्या पाण्याच्या झऱ्यासारखा प्रेमाचा झराच होय असे मला वाटते. वास्तविक आजही मुलींपेक्षा मुलांना जास्त भाव समाजात दिल्या जातो. मुलगा झाला की आनंद व मुलगी झाली की चेहऱ्यावरचे पाणी जरा मुरल्यासारखेच दिसते. पण त्यांना कदाचीत हे माहित नसेल की, एका इंग्रजी जुन्या म्हणीनुसार - One boy is more trouble than a dozen girls.

समजा एखाद्याला दोन मुले व दोन मुली आहेत. दोन मुली या वयात आल्यानंतर लग्न झाले की दुसऱ्याकडे नांदायला जातील पण जर दोन मुले असली तर पालकावर एक प्रकारची जबाबदारी येंवून पडते. कारण जर त्यांना या धकाधकीच्या व स्पर्धात्मक युगात नौकरी लागली नाहीतर त्यांना जन्मभर सांभाळणे ओघाओघाने आलेच. म्हणजे त्यांना दोन घरे तयार करून देणे किंवा त्यांना व्यवसायात जरी घालायचे झाले तर प्रथम भांडवल उभे करणे आलेच. तसेच त्यांचा विवाह झाल्यानंतर सुनेचा व त्याचे मुलांचा ही सांभाळ करणे आलेच म्हणजेच थोडक्यात जबाबदारी ही वाढलीच की नाही. या गोष्टीची जाणीव असूनसुध्दा मुलगाच पाहिजे ही भूमिका योग्य वाटत नाही करीता आजही काळानुसार मुली चांगल्या असे मानसिक परिवर्तन होणे अत्यावश्यक आहे. माझ्या अनुभवानुसार मला तर असे आढळले आहे की काही लोकांच्या मुली या अत्यंत हूशार निघालेल्या आहेत जेंव्हा

की मुले ही फारशी शिकलेली आढळत नाही. शिवाय मुलांच्या तुलनेत मुलीच आई वडिलांवर अतिशय प्रेम करतात असे वाटते.

नातेसंबंधात देण्या-घेण्याच्या ज्या पारंपारीक पध्दती आहेत त्यात थोडी सुधारणा करणे हीसुध्दा आजच्या काळाची गरज आहे. पुर्वी ज्या देणग्या किंवा अहेर पध्दती चालत होती ती राजे महारांजांच्या काळापासून चालत आलेली परंपरा आहे असे म्हणावयास  हरकत नाही. पण आजकाल या पध्दतीचा सगळयांनाच राग यायला लागला आहे कारण एकतर देणे व घेणे ही एक प्रकारची जबरदस्ती आहे असा सगळयाचा समज झाला आहे व जर नाही घेतले तर समोरच्या व्यक्तीला राग येईल असे वाटणे साहाजिकच आहे. त्यामुळे याचा त्रास गरीब वर्गाला जास्त प्रमाणात होतांना दिसतो. ते बिचारे आधीच या महागाइच्या काळात त्रस्त झाले आहे व त्यातही प्रत्येक वर्षी किमान दोन लग्न पकडली तरी त्यांचा प्रवासखर्च मिळून होणारा पैशाचा अपव्यय हा त्यांचे किमान दोन महिण्याचे बजेट निश्चितच बिघडवितो असे वाटते त्यामुळे ते अतिशय हलक्या दर्जाचे कापड सप्रेम भेंट म्हणून देतात की जे शिवायलाही परवडत नाही व त्यामुळे उगीचच तो चर्चेचा विषय बनतो. करीता माझी अशी इच्छा आहे की या रुढी व परंपरा आजच्या काळात जगतांना पूर्णपणे बंद व्हावयास पाहिजे. आता येथे प्रश्न असा निर्माण होतो की कोणीही म्हणतात मग त्यांनी तुमच्या प्रसंगाचे वेळी कसा खर्च केला. पण असा विचार करणे म्हणजे आधि कोंबडी की आधी अंडे असे नव्हे काय ? एकंदरीत कोणीतरी पुढाकार घेतल्याशिवाय जुन्या प्रथा मग बंद कशा व्हायच्या. आणि यामुळेच पुरोहीत वर्गाने ज्या पारंपारीक पुजा पाठाच्या पध्दती लावल्या त्या अजूनही जशाचे तशाच चालू आहेत. व अशा पूजांच्या नावावर भरमसाट लूटसुध्दा चालू आहे. खरा सुशिक्षीतपणा यातच आहे की आता हे बदले पाहिजे. अनावश्यक देवाण घेवाण ही कोठेतरी थांबवावयास पाहिजे. आजकाल तर वाढत्या प्रॉडक्शन्समुळें असे आढळते की लग्नात प्रेझेंट म्हणून आलेल्या बऱ्याच वस्तू या डबल होतात. समजा एका लग्नात सहा घडयाळी आल्या तर त्या तुम्ही कोठे कोठे लावणार व नाही लावली तर देणाऱ्याला किती वाईट वाटणार. अशा सर्व बाबी लक्षात घेता या प्रथेवर प्रत्येकाने विचार करावा व देण्याघेण्याबाबत क्षुल्लक चर्चा या कमीतकमी चर्चेचा विषय होवू नये एवढी तरी

काळजी आजच्या जगात वावरतांना घ्यावी व आपले नातेसंबंध यथोचीत व व्यवस्थित सांभाळावे. कौटुंबिक संबंधामध्ये सर्व प्रथम आपल्याला पतीची भूमिका निभवावी लागते. पूर्विच्या शास्त्राचे अवलोकन जर केले तर त्यात भक्त वामन म्हणतात-

सुपतिः ईश्वरः साक्षात् कुपती राक्षसः स्मृतः !
भरणाच्चोच्यते भर्ता पतनात् त्रायते पतिः !!

याचा अर्थ असा की सुस्वभावी व चांगल्या चरीत्राचा उत्तम पति हा पत्नीला प्रत्यक्ष ईश्वरतुल्यच व अत्यंत प्रिय वाटत असतो पण कुस्वभावी, क्रूर, निष्ठूर व निर्दयी पति हा राक्षस तुल्यच असतो असे पत्नीला वाटत असते. पतनात् त्रायते याचा अर्थ जो पतनापासून वाचवितो तो. अशा व्याख्या पूर्वजांनी सांगितलेल्या आहेत. आजच्या जगात आपण याचे तंतोतंत पालन करू शकतो किंवा कसे हे प्रत्येकाच्या जीवनशैली वर बरेचसे अवलंबून आहे तरीसुध्दा ही बाब या ठिकाणी लक्षात घेण्यासारखी आहे असे वाटते. याउलट पत्नीच्या बाबतीतही भक्त वामन म्हणतात-

सुपत्नी देवता ख्याता कुपत्नी राक्षसीः स्मृता !
पतनात् त्रायते पत्नी, गृहलक्ष्मीः पतिव्रता !!

म्हणजेच सुपत्नी ही प्रत्यक्ष गृहदेवताच होय हे सुविख्यात आहे. अर्थात अशा पत्नीमुळे घराचा उत्कर्ष व उध्दार होतो. सांगण्याचा सारांश असा की, आजच्या जगात वावरतांना ही नाती गोती अत्यंत जबाबदारीने सांभाळावी लागते. ही सांभाळतांना बरेचदा आपण परोपकार भावनेने सर्वांशी वागत असतो पण आजच्या जगात परोपकाराची फेड परोपकारानेच होइल हे सांगता यायचे नाही तेंव्हा याबाबत पुढील प्रकरणाकडे वळू या.

...................................................
...

# परोपकार

वैष्णव जन तो तेणे कहीये जों पर पिडा जाणी रे !
पर दुःखे उपकार करे तोहे, मन अभिमान न जाणे रे !!

असे मी शाळेत असतांना लहानपणी पाठ केलेले आजही मला आठवते. यात नेमकी मला काय चूक आहे हे कळत नव्हते पण आजचा बदलेला हा काळ लक्षात घेता मी याचेशी फारसा सहमत नाही. होवू शकते हेसुध्दा काळाच्या महिमेत येत असावे. आजकाल परोपकार ही व्याख्याच फसवी झाल्यासारखी वाटते. कधीही कोणावर परोपकार करावयास जावे तर तो जणूकाही आपल्या डोक्यावरच बसला असा भास होतो. अर्थात ही झाली विनोदाची भाषा. परोपकार करणे हे खरोखर चांगलेच आहे याबाबत सूक्तिः मध्ये एक संस्कृत श्लोक दिलेला आहे तो असा-

परोपकरणं येषां जागर्ति हृदये सताम् !
विपदश्चैव नश्यन्ति सम्पदः स्युः पदे पदे !!

याचा अर्थ असा की, ज्या सज्जनांच्या हृदयात परोपकार बुध्दि सतत जागृत असते, त्यांच्या सर्व विपत्ति व आपत्ति पूर्णपणे नष्ट होवून त्यांना विपूल संपत्ति व चांगले सुयोग पदोपदी प्राप्त होतात. परंतू याउलट ज्या दुर्जनांच्या हृदयात दुसऱ्याचे नुकसान करण्याची बुध्दि सदैव वास करीत असते, त्यांची सर्व संपत्ति पाहता पाहता अजिबात नष्ट होवून त्यांना पदोपदी घोर विपत्ति व संकटे हटकून प्राप्त होतात असे भक्त वामन म्हणतात. या सर्व बाबी मला या ठिकाणी आठवण्याचे कारण असे की मला माझ्या वडिलांनी संस्कृतच्या परीक्षा दयावयास लावल्या होत्या तसेच लहानपणीच एक अतिशय सुंदर असे पुस्तक वाचण्यासाठी भेंट म्हणून दिले होते.

त्याचे नांव आहे स्वामी शिवानंदाचे 'जीवनाचा सदुपयोग'. हे पुस्तक आज कालबाहय झाले असले तरी त्यावेळचा संस्कार आज मला विचार करावयास भाग पाडत आहे. पण आजचा काळ याला धार्जिन आहे कां हा खरा यक्ष प्रश्न आहे. परोपकार करणे हा एक सदगुण असल्याने त्याचे परीणाम चांगलेच होतात यात तिळमात्रही शंका नाही. माझी बायको अशा प्रकारचा परोपकार फार वेळा करीत असते. तिला सर्व जग हे फारच चांगले आहे असे नेहमी वाटत असते. व मी जरा बुध्दी वादी असा स्वतःला समजत असल्याने मला यातील वाईटच अनुभव येतात. हासुध्दा काळाचा महिमा म्हणावे की  काय तेच कळत नाही असाच एक विनोदी प्रसंग मी आपणास सांगतो. व या जगात वावरतांना या विषयाची गंभीरता ही कमी करण्याचा प्रयत्न करतो  नाही तर हे एखादे फिलॉसॉफीचे च पुस्तक वाटेल.

दुपारची वेळ होती. अकोला येथे उन्हाचा तडाका किती बसतो हे अकोलाकरांनाच माहित आहे. मी त्यावेळी ऑफीसमध्ये गेलो होतो. एक साधारण पंच्चावन्न वयाच्या व्यक्तिने माझ्या माघारी घरी प्रवेश केला व तो (माझ्या दारावरची पाटी पाहून) म्हणाला- मी साहेबांचा दूरचा नातेवाईक आहे. लगेच माझ्या भोळया व परोपकारी बायकोने त्याचे भारतीय परंपरेनुसार आगत स्वागत केले. फ्लॅट सिस्टिम असली तरी माझी  बायको पाहूण्यांना देव समजून पाय धुवावयास पाणी वगैरे देते मग फ्लॅटच्या पायऱ्या खराब झाल्यातरी ती भारतीय परंपरेसमोर हार स्विकारत नाही हे येथे विशेष. तिला वाटले आपल्या हयांचे नातेवाईक म्हणून जरा जास्त चौकशी करून नातेवाईक असल्याचे निश्चित करण्याचा बराच प्रयत्न केला व म्हणाली यांना जरा बोलावून घेते म्हणजे त्यांची तुमच्याशी भेंटगाठ होवू शकते पण माझ्या व्यस्ततेचे कारण सांगून त्यांनी मला बोलावण्याविषयी नकार दर्शविला. तीला हेसुध्दा खरे वाटले व आपण जेवणच करून जा असा आग्रह धरला. त्याने येथेच्छ भोजन केले. भोजनानंतर माझी बायको त्यास नमस्कार करण्याची कशी बरे विसरेल. एवढा मोठा आदर सत्कार पाहून तो बिचारा लाजला असावा की काय त्याचे तोंडून शिव शिव असे निघाले. म्हणजेच थोडक्यात त्यास त्याने भोजन करून फसविल्याची  फार मोठी चूक केली अशा ंतऱ्हेचा माझ्या बायकोला भास झाला. प्रसंग संपला. दोन वाजता मी जेंव्हा घरी आलो तेंव्हा तिने मला हा प्रसंग सांगितला. माझ्या लक्षात

झालेला प्रसंग हा फसवा असल्याचे लवकर आले. नशीब तो व्यक्ति फक्त जेवण करूनच गेला. काही चोरी वगैरे करून गेला नाही. तरीसुध्दा माझी बायको म्हणते काय झाले बिचाऱ्याला भूक लागली असेल म्हणून जेवून गेला. आपण तर परोपकारच केले नां !असो ज्याप्रमाणे अल्बर्ट आइनस्टाइन याची सापेक्षतचा सिध्दांत ही थिअरी त्याचे बायकोस कळत नव्हती त्याचप्रमाणे माझ्या बायकोची ही परोपकाराची थिअरी अजूनही मला इंजिनिअर असून कळली नाही. हे यातले विशेष. तर आजच्या जगात वावरतांना किमान अशा अनोळखी व्यक्तिवर तरी परोपकार करू नये एवढेच माझे सांगणे आहे.

माझे तर असे म्हणणे आहे की फार कोणाचे उपकार घेणेसुध्दा आजच्या काळात गुन्हाच आहे कारण कोण केंव्हा तुमच्या दाराशी अतिप्रसंगाचे वेळी येवून बसेल याची शाश्वतीच नाही. असो प्रत्येकाची जीवनशैली ही वेगळी असते. एकदा माझा एक चपराशी म्हणाला सर द्या मला पांचशे रूपये. मी म्हटले माझ्याकडे तुला द्यायला एवढे पैसे माझ्याकडे नाहीत. तो चटकन म्हणतो सर आपण एवढे मोठे इंजिनीअर असून साधे पांचशे रूपये आपल्याकडे नाहीत. तुम्ही सांगा तुम्हाला किती पैसे पाहिजेत ते मी आता तुम्हास देतो. मी म्हटले तू मागतो आहेस की देतो आहेस. तो म्हणाला साहाब - परोपकार करना सिखो. कभीभी काम आता है ! मला अजूनपर्यंत तरी तो कामी आला नाही. पुढील आयुष्यात तो कधी भेंटेल कोण जाणे. तर असा हा परोपकाराचा महिमा.

.....................................................

.

# पैशाचं मूल्य

आजच्या जगात वावरतांना पैशाला अधिक महत्व आहे. प्रत्येक मनुष्य हा या पैशासाठी मरमर करतो आहे. पैसा नसेल तर सुख नाही अशी परिभाषा झालेली आहे. पैसा मिळवितांना जेवढे परिश्रम घ्यावे लागतात तेवढे पैसे गमावतांना करावे लागत नाही. तो सहजरित्या उडविता येवू शकतो नेमकी हीच जाण आपल्या मुलांना नसते. व जेंव्हा मुले मोठी होतात व त्यांना स्वतःचा पैसा मिळायला लागतो तेंव्हा मात्र त्यांना या पैशाचं मूल्य हळूहळू कळू लागतं. असे म्हणतात हा पैसा खर्च करतांना प्रत्येकाने तीन प्रश्न आपल्या मनाशी विचारायला हवेत. १. जी वस्तू घ्यायची आहे ती खरोखरच आपल्याला आवश्यक आहे काय? ती वस्तू घेण्याची आपली ऐपत आहे काय? आणि तिसरी म्हणजे ती वस्तू घेतल्यानंतर आपल्या घरात आपणास सुख मिळणार आहे काय की फक्त भांडणच होणार आहे. कारण काय की आपल्या घरामध्ये जितक्या व्यक्ति आहेत तितकी मने आहेत असे समजावे म्हणजेच तवढया ईच्छा असतात. व प्रत्येक वेळी प्रत्येकाची इच्छा पूर्ण होइलच किंवा आपण ती पूर्ण करू शकतो हे सांगता येत नाही व अशा कारणाने आपण आपल्या कुटंबात सुखापासून वंचित राहतो. नाहीतर कुटंब प्रमुखाला या पैशासाठी अतिरीक्त मेहनत करावी लागते. वीजेच्या वापरासंबंधात असे म्हणतात की कमी वीज वापर म्हणजेच

विजेची बचत त्याचप्रमाणे पैशाचा कमी वापर किंवा यथोचीत वापर म्हणजेच पैशाची बचत. पैशाची बचत करणे म्हणजे काटकसर. कंजूषपणा नव्हे. पण कधी कधी कंजूषपणाही आपणास श्रीमंत करतो. बरेचदा असे लक्षात येते की श्रीमंत माणसे ही योग्यच खर्च करतात. उदा. सरकारी माणसं लवकर मोटरकार घेतांना दिसतात मग ती कर्ज काढून कां होइनां. पण याउलट श्रीमंत माणसे आधि त्यांचा धंदा किंवा व्यवसाय वृध्दिंगत करतात. तसेच मध्यम वर्गीय व्यक्ती आजही एकटा कुटंब ठेवून वागतो जेंव्हा की व्यापारी वर्गातील मंडळी आजही एकत्र कंटंब पध्दतीचा अवलंब करतांना आढळतात. ते कुटंबाचे सहसा तुकडे होवू देत नाही. एकदा मी सहज कार घेण्यासाठी गेलो. तो व्यक्ती माझ्याशी अगदी सौजन्याने बोलत होता त्याचवेळी दुसरी व्यक्ती कार घेण्यास आली पण त्या व्यक्तीला त्या विक्रेत्याने सौजन्यपूर्ण वागणूक दिली नाही. याचे रहस्य मला न समजल्याने मी उगीच पृच्छा केली. मला लगेच उत्तर मिळाले की सर आपण कार निश्चित घेणार हे मला माहीत आहे व तो मघाचा ग्राहक कार घेणार नाही हेसुध्दा मला माहित आहे. मी म्हटले कसे काय आपण ओळखलात. त्यांने उत्तर दिले. फार सोपं आहे अशा बाबी ओळखनं आम्हा विक्रेत्यांना कारण आम्हास हे पक्के माहित आहे की सरकारी नोकरच अशा वस्तू घेण्यासाठी फार उत्सूक असतात व मघाचा तो व्यक्ति हा व्यापारी होता त्याने कधीच लवकर निर्णय घेतला नसता. मी क्षणभर त्याच्या निरीक्षणाचे उत्सूकतेने मनाशीच कौतूक करीत होतो. व मला माझी चूक लक्षात आली. पण मी शेवटी कार घेण्याच्या निर्णयामध्ये तरीसुध्दा ठाम राहलो याचे आजही आश्चर्य वाटते. येथे मी स्वतःचेच उदाहरण यासाठी दिले की, व्यापाऱ्यांचासुध्दा या सरकारी नोकरावर केवढा मोठा विश्वास आहे की नोकरवर्ग किती पैशाच्या बाबतीत भोळे आहेत. याचाच फायदा आजच्या जगात वावरतांना जाहिरातवाले घेत असतात. अगदी कोणतीही ऑफर पाहली तर ती या महिण्याच्या शेवटच्या तारखेपर्यंतच आहे असे दर्शवितात व ती तारीख निघून गेली की मग पुढच्या महिण्याची तारीख सांयिस्कर रित्या ते ठरवितात. मला तर कधी कधी असे वाटते की जाहीरात वाल्यांकडे मानसोपचार तज्ञ तर कार्यरत नसतील. या जाहिरात युगामध्ये माणसं कमी व प्रॉडक्शन जास्त अशी अवस्था प्राप्त झाली असल्याने यापुढे ते सर्व वस्तू फुकट वापरावयास देतील की

काय अशी शंका वाटते. अहो चक्क एका पँटवर बारा पँट फ्री म्हटल्यावर आपण बारा पँट कसे वापरणार. पण ऑफर आहे ना ं मग धावा तिकडे. कारण उद्या ऑफर पळून जाण्यापेक्षा आपणच पळाले तर बरे असे वाटते. पैसा कसा ओढावा हेच तंत्र आजच्या जगात वावरतांना दिसून येते. तसेच टीव्हीवरील कार्यक्रम बघतांना असे कदाचीत आपणास वाटत असेल की हा कार्यक्रम आपणास फुकटात पहावयास मिळत आहे पण नाही तोही आपल्याला फुकटात पचू देत नाही. कार्यक्रमाच्या शेवटी आपणास एसएमएस पाठवावयास सांगतात. आपण त्यात एवढे गुंग होवून जातो की केवळ एक रूपयाचा एसएमएस आहे या भावनेने तो पाठवितो या प्रकारे ते लाखो रूपये गोळा करतात. प्रथम आपणास मोफत एसएमएसची सवय लावतात व नंतर भरमसाठ लुटतात. कधी कधी तर विनाकारणच अतिशय सोपे प्रश्न विचारतात म्हणजे सर्वसामान्यांना हा भास होतो की जणूकाही या प्रश्नाचे उत्तर त्याला एकटयालाच माहित आहे व तो यात फसतो. मला तर वाटते की गाइचे दूध पांढरे की काळे असा जरी प्रश्न त्यांनी विचारला तरी कदाचीत किमान एक लक्ष रूपये ते सहज कमावतील असा अंदाज आहे.

पूर्वीच्या काळी पैशाची बचत करा असे म्हणत होते व आज पैसा ताबडतोब घेवून जा असे म्हणतात म्हणूनच तर या पैसे देण्याच्या एटीएम मशीन्स बाजारात उपलब्ध आहेत. यालाच वाणिज्य शाखेच्या भाषेत पैशाची रोखता असे म्हणतात. श्रीमंतांना पैसा मार्केटमध्ये खेळता ठेवायचा आहे. आता पैसे खर्च करण्यावर सगळयांचा जोर आढळून येतो. बरं या मशीनमध्ये तुम्हाला दहाची नोट तर कधीच मिळत नाही कारण दहा मध्ये तुम्हास येते तरी काय असे तर या मशीनला सूचवायचे तर नसेल. आजकाल मुलांच्या खाउसाठीसुध्दा शंभरची नोटच हातात येते. अशावेळी मात्र आमच्या आदरणीय वृध्द मंडळीची फार पंचायत होते बरं कां ? याचा अर्थ आजच्या काळात जे काही निघत आहे ते या अर्थासाठीच आहे असे वाटते. विज्ञानाच्या या प्रगतीमुळे वस्तू वाढल्या व या वस्तूमुळे आजच्या गरजा वाढल्या असाव्या असे वाटते. पूर्वी माणसासाठी जेवण की जेवणासाठी माणूस असे विनोदाने लोकं म्हणायचे आता तर असे म्हणावेसे वाटते की माणसासाठी वस्तू की वस्तूसाठी माणूस. मी कोठेतरी यापूर्वी असे वाचले की म्हणे या जगात आता कचरा

हासुध्दा एक मोठा प्रॉब्लम होणार आहे. कारण पूण्यासारख्या ठिकाणी तर कचरा ठेवावयास जागाच नाही. हीच परिस्थिती प्रत्येक शहरात येणार आहे. आणि पैशाची तर अवस्था अशी होईल की ते कसे बाळगावे हाच प्रश्न जनसामान्यासमोर उभा राहील. आजकाल वस्तू एवढया झाल्या आहेत की ऑफीसला जातांना स्वतःचा खिसा हा लहान पडत चालला आहे. काय काय भरणार त्यात. बघा पेन, चष्मा, मोबाईल, चाबी, रूमाल, डायरी, ईतर महत्वाची कागदं, वीज बील, मोबाइल बील, व इतर महत्वाची कागदं. एकदा मला माझा सहकारी म्हणाला -सर तुमचे पॉकेट फार भरलेले दिसतात. मी त्याला म्हटले अरे त्यात पैसे कमी व विविध कार्ड व इतर कागदं फार ठासून भरलेली आहेत. दर सोमवारी मी त्या सर्वांचं सॉर्टींग करतो पण ते एकसारखे गर्दी करीतच असतात. आता माणसंच जागोजागी गर्दी करतात तर या बिचाऱ्या कागदांना काय उगीचं म्हणावं या विचाराने मी असली तेवढी सगळी कागदं माझ्या पॉकेटात कोंबत असतो. मग त्यांना किती वाईट वाटत असेल याचाही कधी विचार करीत नाही.

या पैशाबाबत एक गंमत सांगतो. एकदा मी रेल्वेने प्रवास करीत होतो. एक डोंबारीन, तिच्या दोन वर्षाच्या मुलीकडून वाकण्याच्या करामती करवून प्रवाश्यांचे मनोरंजन करीत होती सोबतच ती ढोलकही वाजवित होती. खेळ फक्त एक किंवा दोन मिनिटांचा असेल त्यामुळे काही प्रवाशांनी त्या बालिकेस मदत म्हणून एक एक रूपया दिला. पण झाले काय की एका प्रवाशाकडे केवळ पन्नास पैशाचे नाणे होते. तो मला म्हटला साहेब या मुलीला पन्नास पैसे दिले तर चालेल काय. मी म्हटले कां नाही तो ही शेवटीच पैसाच आहे नां. माझ्या बोलण्यावरून त्याने ते लहान नाणे तिला दिले. त्या बालिकेला बिचाऱ्या या पैशाचे काय महत्व, तिने केवळ मेहनत केली होती पण आश्चर्य असे की जेंव्हा तिच्या आईने ते पैसे पाहले तेंव्हा तिच्या हातून अतिशय रागाने हिसकून ते बाहेर फेकून दिले व तिला इतका, त्या ढोलकीच्या काडीने तीव्र मार दिला की तिलासुध्दा हे कळले नसावे की हा मार कशासाठी मिळाला. एवढा माज त्या डोंबारीन जवळ होता. पन्नास पैशाचे नाणे न स्विकारणे ही आजच्या जगात किती आश्चर्याची गोष्ट आहे. याउलट श्रीमंत व्यक्ति कितीही श्रीमंत असला तरी कमीतकमी पैशाचा असा अपमान कधीच करतांना आढळून येत नाही.

सांगण्याचं तात्पर्य एवढचं की या पैशाचं कितीही अवमुल्यन झालं तरी काही पैसा आपल्या हाताशी असणे आजच्या जगात वावरतांना महत्वाचे आहे. नाहीतर ठेविले अनंते तैसेचि राहावे .... पण असे राहण्यासाठी माणसाला संतुष्टचित्त हवे. अतृप्ती किंवा ईच्छांवर नियंत्रण हवे. याबाबत मला येथे ही एक भक्त वामनाचा श्लोक आठवतो.

संतुष्टं मानसं यस्य सः श्रीमंतः खलु स्मृतः !
अतृप्तं मानसं यस्य स दरिद्रः सुनिश्चितः !!

याचा अर्थ जो संतुष्टचित्त आहे तोच खरा भाग्यवान मनुष्य समजल्या जातो आणि जो अतृप्त व असंतुष्ट आहे तो महान दरिद्री  व दुर्भागी समजला जातो. तरीसुध्दा करोडो रूपये कमावणारे श्रीमंत लोकं एवढया करोडो रूपयाचे करतात तरी काय हा प्रश्न सर्वसामान्यांना भेडसावत असतो म्हणूनच कदाचित ही विषमता समाजामध्ये पहावयास मिळते व या अनावश्यक श्रीमंतीमुळेच चोऱ्या चपाटयाचे प्रमाणही वाढत असावे. ज्यांना कष्ट करूनही पुरेसा पैसा मिळत नाही त्यांनी दुसरे काय करावे याचा विचार आजच्या जगात वावरतांना प्रत्येकाने करावयास पाहिजे नाहीतर समुद्रातल्या माशांप्रमाणे मोठी मासोळी लहान माशांना खात राहील हा निसर्गाचा नियम माणसांसाठी सुध्दा चालूच राहील यापेक्षा मानवाचे दुदैव अजून काय ?

•••••••••••••••••••••••••••••••••••••••••••••••••••••
••••

# मानवी गरजा व धावपळ

Necessity is the mother of invention. हे सर्वांनाच माहित आहे त्यामुळेच तर या जगात अशा मानवी गरजांमुळे अनेक प्रकारचे निरनिराळे शोध लागलेले आहेत व अजूनही मानव शोध लावीतच आहे. मागच्या प्रकरणात आपण पाहिले आहे की वस्तूंच्या निर्मीती या मानवी गरजांपेक्षा जास्त प्रमाणात होत आहेत. त्यामुळे जास्त पैशाची गरज प्रत्येकाला जाणवू लागली आहे. गरजा वाढल्या की मानवी जीवनाची धावपळ सूरू होते. मग या धावपळीतून होणारी कामे तर एका बाजूला पडतात पण कधी कधी याचा दुरूपयोगच जास्त प्रमाणात दिसून येतो.

माझे वडिल शिक्षकी पेशामध्ये होते. त्यामुळे ते कधी कधी फार मार्मिक बोलायचे. एकदा ते मला म्हणाले की सध्या तुमच्या घरी किती घडयाळी आहेत. मी म्हटले - भिंतीवर चार खोल्यांमध्ये चार व प्रत्येकाच्या हाताला एक याप्रमाणे साधारणपणे एकूण आठ घडयाळी आहेत. बरं मग सध्या त्या सर्वांची प्रकृती छान आहे नां ! मी म्हटले, होय. कां बरं. नाही जेंव्हा त्यांचं वयं वाढेल तेंव्हा तुला कळेल. व एक एक घडयाळ जेंव्हा बिमार पडेल तेंव्हा त्यांचे परिरक्षण करणे किती

महागात पडेल याची तुला जाणीव होइल. खरचं यात जे मर्म होते ते आज माझे वडिल हयात नसतांनासुध्दा कळत आहे की जेंव्हा एखादी बाब मेंटेनन्सला येते तेंव्हा ती इतकी भारी जाते की मग सायकल सारखी वस्तूसुध्दा नकोशी होवून जाते.

हे सांगण्याचा येथे उद्देश एवढाच की या बाबी आपणास कळत नाही असे नव्हे तर आपण भावनेच्या आहारी जावून किती अनावश्यक शॉपिंग करतो व त्यासाठी करत असलेली धावपळ ही तर निराळीच बाब आहे. धावपळ करतांना आपण कोणत्याही गोष्टीची एवढी घाई करतो की ते काम व्यवस्थित तर होतच नाही पण त्यात अजून जास्तच बिघाड होतो. माझ्या आयुष्यातील असाच एक गंमतीदार प्रसंग सांगतो. एकदा मला  व माझ्या मित्राला सिनेमाला जायचे होते. सिनेमा टॉकीज अतिशय जवळ होती पण आम्हाला तेथे जाण्याची अति उत्सुकता लागली असल्याने आम्ही तेथे शॉर्टकटने जायचे ठरविले. साधारण जुलै महिण्याचे ते दिवस होते. शॉर्टकट शोधण्याचा मूळ उद्देश की तेथे लवकर पोहोचावे. पण नेमके झाले काय की जो रस्ता आम्ही निवडला होता त्या रस्त्याने थोडा चिखल आढळला. वाटले थोडासाच असेल पण जसे जसे पुढे जातो तसे तसे त्या चिखलचाची खोली वाढतच गेली. संध्याकाळची वेळ असल्याने तेथे पाणी अंधुकसे दिसत होते परंतू पाण्याच्या खोलीचा अंदाज आम्हाला आला नाही. त्यामुळे हळूहळू पाण्यात तर बुट भिजलेच उलट बुटामध्ये चिखल जावू लागला. अशा वेळी मागे जाणेसुध्दा घाईमुळे शक्य नव्हते. शेवटी आहे त्या अवस्थेत पुढे निघून गेलो, परीणाम असा झाला की तो सिनेमा तर आम्हास वेळेवर मिळालाच नाही उलट झालेली फजिती पाहून आम्हास आमचे हसूपण येत होते व आश्चर्य पण वाटत होते की एवढी घाई केवळ सिनेमासाठी करण्याची आवश्यकता काय होती. यातून मात्र आम्हाला एक उपदेश कळला की - रास्ता चलना साफ, चाहे उसीमें फेर हों ! हे मी कोठेतरी अगरबत्तीच्या कॅलेंडरवर वाचलेले होते. अशा प्रकारची धावपळ आजकालचे विद्यार्थी फार करतांना आढळतात. परीक्षेच्या नेमक्या अर्धा तास आधी तेथे हजर राहण्याच्या सूचना असूनसुध्दा  नेमके वेळेवर ते घरून निघतात व मग या अशा धावपळीमुळे नको ते अघटीत घडत असते. असे म्हणतात- It is better to be, one hour earlier than to be late by one minute.

आपण रस्त्यावर नेहमी वाहने धावतांना पाहतो त्यापैकी खर काम किती लोकांना असू शकते याचा आपण अंदाज तर करू शकत नाही पण एवढं मात्र निश्चित की साधी  सुई जरी घ्यायची म्हटले तरी वाहन घेवून आपण बाजारात पळतोच की नाही. आजकाल बिगबाजार निघाले असल्याने तेथे सर्व वस्तू मिळतात पण कधी कधी अनावश्यक वस्तूसुध्दा आपण घेवून येतो. जशी जशी लोकसंख्या वाढत जाइल त्याप्रमाणे ही धावपळ सगळयांना अगदी महागात पडणार आहे. एकदा मी मार्गारेट हाइडचे 'धिस क्राउडेड प्लॅनेट ' हे पुस्तक वाचले त्यात मानवाच्या या गर्दीविषयी फारच मनोरंजक अशी माहिती दिलेली आहे. धावपळ ही माणूस मुद्दाम निश्चितच करीत नाही तरीसुध्दा काही गरजा जर आटोक्यात आणल्या तर यावर नियंत्रण होणे शक्य आहे. आजचा काळ तरी गरजा कमी करण्याचा आहे असे या धावपळीवरून व होणाऱ्या अपघाताच्या प्रमाणावरून वाटते. ज्यांची मुले कोणताही कामधंदा करीत नाही किंवा ज्यांना कर्मधर्मसंयोगाने कोणत्याही प्रकारच्या, उच्चशिक्षण घेवूनही नोकऱ्या लागल्या नाही त्यांचे तर पालकांना सेवानिवृत्त झाल्यानंतरसुध्दा वयाच्या ऐंशीव्या वर्षीसुध्दा अत्यंत धावपळ करावी लागते. हे एक दुर्दैवच म्हणावे लागेल.

आजच्या जगात वावरतांना सर्वसामान्य मनुष्य अशा धावपळी कां करीत असेल याचे मुख्य कारण भविष्याची चिंता. या चिंतेविषयी पुढील प्रकरणाकडे वळू.

..................................................

# चिंता

मन चिंती ते वैरी न चिंती ! किंवा चिंता ही चितेप्रमाणे असते असे म्हणतात. तरीसुध्दा या जगात प्रत्येक मनुष्य चिंता ही करतोच. चिंता करणे म्हणजे एक प्रकारचे नको त्या बाबीबाबत विनाकारण केलेला विचारच होय. आता हा विचार नेहमी मनात घोळत असतो व आपल्याला धड वर्तमान काळही व्यवस्थित जगू देत नाही. विचार हे स्मरण शक्तिमुळे येतात व स्मरण शक्ति ही अनुभवातून निर्माण होते असे म्हणतात. आणि म्हणूनच परत माणूच विचाराप्रमाणे कृती करण्यापेक्षा तो केवळ विचारच करीत बसतो. जे बुध्दिजीवी आहेत ते कमी अधिक प्रमाणात चिंता ही करतातच. पण या चिंतेमुळे आपण कधी कधी इतके ग्रासले जातो की मग आपल्याला वर्तमान काळाचा जरासा ही आनंद घेता येत नाही. आजच्या जगात वावरतांना चिंता ही नष्ट झाली पाहीजे याकरीता साधारण कसे जीवन जगले पाहीजे हे बघू.

सर्व प्रथम आपल्या दैनंदिनीमध्येच थोडासा बदल जर केला तर यापासून थोडीपार मुक्तता होवू शकते. स्वतःला व्यस्त ठेवणे हे जरी जमले तरी आपण आपल्या जीवनात बराच बदल घडवू शकतो असे वाटते. Horace Walpole म्हणतो- Life is a comedy for those who think and a tragedy for those who feel. याचा अर्थ आपण विचार करून जर काही वाटूनच घेतले नाहीतर जीवन हे दुःखद व्हायचा प्रश्नच कोठे येतो. आपल्या मनाला ताब्यात ठेवायचे असेल तर मनाला विविध प्रकारचे प्रनच विचारू नयेत. वारंवार

प्रश्न विचारले की चिंता निर्माण होत जाते. असे म्हणतात. Animals are such agreeable friends, they ask no questions pass no criticisms. या जॉर्ज इलियटच्या वाक्याचा खरोखर आपण विचार केला पाहिजे.

एकदा अशीच डिपार्टमेंटची सभा आयोजीत करण्यात आली होती. ही सभा जरा वरच्या पातळीवरची असल्याने सर्वच मंडळी विनाकारण घाबरत होती की काय होईल पण प्रत्यक्षात जेंव्हा सभेची वेळ आली तेंव्हा कळले की ती सभाच रद्द झाली. सगळयांनी मोकळा श्वास सोडला व सर्व म्हणाले अरे आपण उगीच चिंता करीत बसलो होतो. म्हणजेच तेवढा वर्तमान काळ सगळयांचा व्यर्थ गेलाच की ! आमचा एक मित्र मात्र नेहमीच बिनधास्त असतो त्यामुळे तो फार आनंदी अवस्थेत दिसतो. आपल्याला उगीच ज्ञानेश्वरासारखी विश्वाची काळजी लागलेली असते. यात आपला रोल अतिशय नगण्य आहे त्यामुळे उगीच वाटणारी चिंता सोडून दिली पाहिजे. याबाबतीत विद्यार्थी तर फारच काळजी करतांना दिसतात. परीक्षेच्या वेळी त्यांना वाटत असते की परीक्षक आपले दुश्मन आहेत की काय. वास्तविक शिक्षकांकरीता परीक्षा घेणे हे रूटीन वर्क असते ते याचा विचारही करीत नसतात याउलट त्यांना असे निर्देश असतात की सर्वसाधारण विद्यार्थी हा परीक्षेत उत्तीर्ण झाला पाहिजे या दृष्टीनेच पेपर काढावा. ओशो म्हणतात मी बोलतांना माझ्या मेंदूचा वापर अवश्य करतो पण जेंव्हा थांबतो तेंव्हा मात्र माझा मेंदू विचारशून्य असतो. याच प्रमाणे जागतिक पातळीवरचे विचारवंत जे. कृष्णमूर्तिसुध्दा म्हणतात की मी खूप प्रकारचे ग्रंथ वाचून स्मरणशक्तित विनाकारण डेटा भरून ठेवत नाही तर सर्व निर्णय योग्य बुध्दि ठेवूनच घेतो. आजच्या जगात वावरतांना या प्रकरणातून फक्त एवढेच घ्यावे की फालतू चिंता करून आपल्या जीवनाचा वेळ वाया घालवू नये. हे सगळयांना समजत असले तरी यापुढे विशेष प्रयत्न करून प्रत्येकाने आपले जीवन आनंदाने घालवावे हाच या लेखाचा प्रपंच.

••••••••••••••••••••••••••••••••••••••••••••••••

# जिद्द व चिकाटी

फेब्रुवारीचे ते दिवस होते. उन्हाळा जेमतेम लागलाच होता पण तशातही विद्यार्थ्यांना दहावीच्या परीक्षेचा अभ्यास सुरू करायचा होता. कारण दहावीच्या परीक्षा लवकरच सूरू होणार होत्या. दहावीच्या परीक्षेला बसणारी मुले फार तर पंधरा सोळा वर्षाची असतात. त्यांचे बालबुध्दीमध्ये जीवनाचा आशय, आकांक्षा किंवा ध्येय ही असतात की नाही हे आपण सांगू शकत नाही पण सर्वच मुले साधारण अभ्यास करतात. परीक्षा नेहमीच्या वेळेवर आटोपल्या. एका विद्यार्थ्याचा तीन मार्काने गुणवत्ता यादीतील क्रमांक घसरला. व तो त्याचे अपेक्षेप्रमाणे मेरीटमध्ये आला नाही. तो मात्र हूशारच होता यात काही वाद नाही त्यामुळे त्याच्या शाळेलासुध्दा असे वाटत होते की हा मुलगा नक्कीच मेरीटमध्ये येवून शाळेचेसुध्दा नांव कमावेल. पण सर्व प्रयत्न अपयशी ठरला. त्या विद्यार्थ्यास तर इतके दुःख झाले की जणूकाही आपण नापासच झालो आहोत. Every success is behind the women. असे म्हणतात. पण तेही त्यास खोटे वाटत होते. कारण त्याची आई त्याचा अभ्यास चांगला व्हावा यासाठी सतत प्रयत्नशील राहत असे. अशा तऱ्हेने वेळ निघून गेला. अशा तऱ्हेचे अपयश आले की कोणीही खचून जातो. पण हा विद्यार्थ्यी अधिकच मनोधैर्य धरून

होता. अपयश ही यशाची पहिली पायरी आहे असे त्याचे, शिक्षकी पेशामध्ये असलेले आजोबा म्हणायचे. आजोबाच्या बोलण्याचा कदाचीत या बालकावर अतिशय परीणाम झाला की काय कोणास ठावूक. पण या त्याच्या मजबूत विचाराने त्याने बारावीमध्ये अतिशय जोमाने अभ्यासास सूरूवात केली. 'प्रयत्नांती परमेश्वर' या उक्तिनुसार तो बारावीच्या गुणवत्ता यादीमध्ये मात्र झळकला. त्यानंतर त्याने यशाच्या बाबतीत कधीही मागे वळून पाहले नाही. व तो आजच्या घडीला टाटा रिसर्च डिझाइन ॲण्ड डेव्हलपमेंट सेंटर येथे संगणक सिस्टिम अभियंता या पदावर यशस्वीरित्या कार्यरत आहे. याचा मला अतिशय स्वाभिमान आहे कारण  कर्मधर्मसंयोगाने तो माझाच मुलगा आहे. आशय त्याचे नांव. खऱ्या अर्थाने त्यास जीवनाच आशय समजल्याचे मला आश्चर्य वाटते. अशाच प्रकारे बऱ्याच पालकांची मुले यशाच्या शिखरावर पोहोचलेली आहेत. याचे मुख्य कारण जिद्द व चिकाटी. जिद्द ही केवळ अभ्यासासाठीच पाहिजे असे नव्हे तर आजच्या जगात वावरतांना जीवनात खरे यश मिळवायचे असेल तर उपरोक्त जिद्द व चिकाटीचा गुणधर्म हा प्रत्येक विद्यार्थ्याने मनात बिंबविला पाहिजे. यालाच इंग्रजीत Perseverance असे म्हणतात.

१९७२ ला मी हायर मॅट्रीकला असतांना एक अतिशय गरीब मुलगा आमच्या पब्लीक स्कूलमध्ये माझ्याच वर्गात होता. तुकाराम किसन हटवार हे त्याचे नांव. आम्ही सोबतच अभ्यास करीत असू. पण तो माझा जास्त जवळचा मित्र असल्याने व त्याचा नंबर पहिला येत असल्याने मी ही त्याचे जवळचा नंबर प्राप्त करावा अशी त्याची मनोमन इच्छा असायची. दोघांनीही अभ्यास सूरू ठेवला होता. पण माझे प्रयत्न कमी पडत गेले. तो मात्र गुणवत्ता यादीत आला. त्याकाळात गुणवत्ता यादीत येणाऱ्याला अतिशय महत्व असायचे. त्याला ईन्स्टीटयूट ऑफ सायन्स नागपूर येथे प्रवेश मिळाला. व तो तेथेच एमएससीसुध्दा झाला. तो युनिव्हसीटीत दुसरा असल्याने त्यास पी. एच. डी. साठी टेक्सास युनिर्व्हसिटी अमेरिकेत प्रवेश मिळाला. तो सध्या गुजरात येथे ओएनजीसाी मध्ये चांगल्या पदावर कार्यरत आहे. मी जर त्याची जिद्द बाळगू शकलो असतो तर आज मी कोठे असतो ही कल्पना करून आजही मला थोडया प्रमाणात दुःख होते. असो मला त्यावेळी वर्धा येथे जानकीदेवी बजाज विज्ञान महाविद्यालयात प्रवेश मिळाला होता. पण आश्चर्याची

गोष्ट अशी की मला आधिपासूनच गणित हा विषय किचकट वाटत असल्याने पहिल्याच वर्षी मला गणिताच्या तिसऱ्या पेपरमध्ये ५० पैकी फक्त एक गुण मिळाला. आश्चर्य या गोष्टीचे वाटले की मला फक्त एक गूण मिळूनही माझ्या, शिक्षकी पेशेत असलेल्या वडिलांनी मला काहीच म्हटले नाही, उलट माझी स्तूती केली व म्हटले की तू अभ्यास केला पण जरा अतिशय कमी पडला. हरकत नाही. जो विद्यार्थी एक मार्काचा अभ्यास करू शकतो. तोच शंभर मार्काचाही अभ्यास करू शकतो. मला मात्र वडिलांनी काही म्हटले नाही याचे आश्चर्यापेक्षा दुःख जास्त झाले. व मी जोमाने अभ्यासास सूरूवात केली. त्यामुळे मला शासकीय तंत्रनिकेतनात प्रवेश मिळाला व मी आज उपविभागीय पदावर कार्यरत आहे. हे केवळ विद्यार्थ्यांना जिद्द निर्माण करण्याकरीता नमूद केले आहे. गणितात एक मार्क मिळविणारा विद्यार्थीसुध्दा भविष्यात इंजिनिअर होवू शकतो एवढेच मला यातून सांगायचे आहे. तसेच विद्यासागर रामचंद्र पवार हासुध्दा सध्या भारतीय सांखिकी संख्या संस्था, कलकत्ता या भारतातील एकमेव अशा संस्थेमध्ये रिसर्च करतो आहे. या सर्व बाबी जिद्द व चिकाटी या सदरात मोडतात.

दुसऱ्यांच्या चुकांवरून आपण शिकलो पाहिजे असे म्हणतात कारण प्रत्येक चूक करण्याची संधी आपणास या जीवनात मिळेलच हे सांगता यायचे नाही. तसेच प्रत्येक व्यक्ति स्वतंत्रपणे जन्माला आला असल्याने स्वतःचे जीवन सुखाने घालवावे की ते दुःखद असावे हे ठरविण्याचा अधिकार ज्याचा त्याचा असल्याने मला असे वाटते की या जगात वावरतांना ज्याचा त्याने विवेक ठेवून जिद्द व चिकाटी बाळगावी एवढाच या लेखाचा उद्देश आहे.

या संदर्भात विद्यार्थ्यांनी ए. पी. जे. अब्दूल कलाम यांचे ‘इग्नायटेड माईड‘ हे पुस्तक जरूर वाचावे असे मला वाटते.

.....................................................

....

# विनोदाचे महत्व

लहान मूल दिवसातून चारशे वेळा हसत असते. असा हास्य निरीक्षकांचा प्रत्यक्ष गोळा केलेल्या आकडेवारीवरून अंदाज आहे. माणूस मात्र दिवसातून फारसा हसत नसल्याचे निरीक्षणात येते किंबहूना तो या तुलनेत कमीच हसतो असे वाटते. होतं काय की माणूस हा दैनंदिन व्यवहारात इतका व्यस्त असतो की तो त्याचे व्यवसायामुळे म्हणा की व्यस्ततेमुळे म्हणा त्यास विनोद निर्मीतीचा आनंद घेण्यास पुरेसा वेळ मिळत नाही. तसेच कमी अधिक प्रमाणात माणसाच्या चेहऱ्यावर अहंकाराचेसुध्दा सावट असतेच की...

या जगात वावरतांना विनोद बुध्दि प्रत्येकाजवळ असावयास हवी. या विनोदाचे मुख्य महत्व असे की, आपल्या दैनंदिन जीवनामध्ये, हास्यामुळे चिंता मुक्ति, दुःखहरण, होवून जीवन आनंदी करता येते. एकांतवासात फारसे न राहता मित्रमंडळी गोळा करून संध्याकाळी एकत्र येवून विनोदात्मक चर्चा करून छोटया प्रकारचे हास्य संमेलन आयोजित केले पाहीजे. आजकाल तर विनाकारणच हासण्याचे प्रकारसुध्दा केल्या जातात. ती एक प्रकारची हास्य थिरपीच होय. आजकाल सिरीयस चित्रपट फारसे चालत नाही याउलट विनोदाचे कार्यक्रम सर्व मंडळी अगदी आवडीने पाहतात. विनोदी चर्चा करतांना हा विषय अश्लिलतेकडे

झुकणार नाही याची थोडीसी दक्षता घ्यावयास पाहिजे. माझा एक मित्र म्हणायचा आम्ही कोणत्याही गप्पा धार्मिकतेपासून सूरूवात करतो पण त्याचा शेवट मात्र नेहमी खालीच घसरतो याचे बरेचदा आश्चर्य वाटते.

या विश्वात माणूस हा एकच प्राणी असा आहे की निसर्गाने त्यास हसण्याची परवानगी दिलेली आहे. अन्यथा कोणताही प्राणी त्याचे मर्जीनुसार हसू शकत नाही. हे अत्यंत महत्वाचे आहे पण बरेचदा असे जाणवते की माणूस कधीकधी याचा दुरूपयोगही करतो कारण तो बरेचदा कुत्सीत बुध्दिनेसुध्दा हसत असतो. जसे की कोणी सायकल वरून पडला किंवा कोणाची उडवायची असल्यास किंवा कोणी वेडयासारखे वागले तर. . अशा बाबींना हसण्यापेंक्षा त्यास आपल्या मदतीची फार आवश्यकता असते याची जाणीव ठेवावयास पाहिजे. समजा की आपण कोणाची गंमत नेहमी करीत असू तर त्याचे कारण एकच असते की तो बिचारा ते त्याचे स्वभावानुसार सहन करीत असतो पण हीच जर गंमत एखादेवेळी त्याने केली तर मात्र या व्यक्तिस अतिशय वाईट वाटत असते या बाबी प्रत्येकाने टाळल्या पाहिजे. विद्यार्थ्यी जीवनात असे फार आढळून येते. त्यामुळे चांगले संबंध दुरावतात. एकदा दुरावलेले संबंध परत कधी जोडले जाण्याची शक्यता फार कमी असते. या प्रकरणामध्ये काही विनोदी किस्से सांगायची इच्छा आहे अर्थात ते थोडे जुन्या प्रकारचे आहेत कारण हे प्रसंग काल्पनिक असून ते मला माझ्या वडिलांनी सांगितलेले आहेत. आज वडिलापार्जित आठवण म्हणून हा मानस आहे.

एकदा एक कंजूष मनुष्य बाजारात गेला. काही वस्तूंची खरेदी झाल्यानंतर त्यास चार आणे म्हणजे आजच्या काळचे पंचेवीस पैसे दुकानदारास अतिरीक्त दयावयाचे होते. दुकानदार म्हटला काही हरकत नाही पुन्हा केंव्हा तरी दयाल. बरेच दिवस होवून गेले पण त्याने ते पंचेविस पैसे त्या दुकानदारास परत केले नाही. त्यास वाटले आतापर्यंत तर दुकानदार हे कदाचीत विसरूनही गेला असेल. पण असे होणे शक्य नव्हते कारण त्या काळचे दुकानदार पैशाचा व्यवहार कधीच विसरत नसत. ठरल्यानुसार तो दुकानदार त्या व्यक्तिच्या गावामध्ये गेला. व पैसे मागू लागला. पण यावेळी त्याने वेगळी सबब सांगून पैसे परत केले नाही. असेच दोन तीनदा झाले. तो परत मागायला येइलच या भावनेने त्या कंजूष व्यक्तिने एक

आयडिया केली. गावातील मंडळींना पटवून ठेवले की तो जर पैसे मागावयास आलाच तर मला अगोदर कळवा म्हणजे मी मेल्याचे सोंग करतो. मला बाहेर तिरडीवर ठेवा. व तुम्ही त्यास सांगा की हा तर मेला. ठरल्याप्रमाणे दुकानदार गावात आला व त्याचे घरी येवून पाहतो तर तो अंगणामध्ये तिरडीवर. . गावातील लोक म्हणायला लागले. . अहो तो मेला आहे. आपणास आपले पैसे मिळणे अशक्य आहे. तो मात्र यांचेपेक्षाही भारी निघाला. व म्हणाला. . काही हरकत नाही मेला तर मेला. . पण आता तो मेला. . त्यामुळे त्याचा अंत्यविधीसुध्दा मीच आटोपून घेतो...म्हणजेच त्यास जाळण्याचे काम मीच करतो. . शिडी उचलल्या गेली ...याची बॉडी चक्क स्मशान घाटात नेण्यात आली पण हा काही हालचाल करेना...सरण रचण्यात आले. . आता त्यास सरणावर ठेवण्यातसुध्दा आले.... आता त्यास अग्नी देणार इतक्यात एक म्हातारा दुकानदाराला म्हणाला अहो कशाला त्याला बिचाऱ्याला जाळता.... तो चक्क मरून जाईन पण तुमचे चार आणे मात्र कधीच देणार नाही. . कारण की तो अस्सल कंजूष मनुष्य आहे. अशी ही काल्पनिक गंमत आहे.

अशा अनेक गंमती माझे वडिल शिक्षक असल्याने मला सांगायचे. यात सांगण्याचे तात्पर्य एवढेच आहे की आपणही आपल्या मुलाबाळांसोबत काही आपल्या जीवनाचा महत्वाचा वेळ काढून मुलांचेच नव्हे तर सर्व कुटुबियांमध्ये आनंद निर्माण करावा. व विनोदाचे जीवनात महत्व या जगात वावरतांना बाळगावे हा या लेखाचा एकमेव उद्देश.

सुख व आनंदामध्ये हाच फरक आहे की सुख हे भौतिक साधनानेसुध्दा मिळविता येते परंतू आनंद हा मात्र मानसिक पातळीवरचा असल्याने तो अशा विनोद निर्मीतीनेच आपण मिळवू शकतो. असे म्हणतात की - You can purchase a bed but youn cannot purchase a sleep.

.........................................................

# क्रोध

Anger is a traits of fools. हे एक सुंदर कोटेशन असले तरी कृपया तुमच्या बॉसच्या समोर वापरू नका. कारण त्याचा राग अजूनच भडकण्याची शक्यता आहे. राग किंवा क्रोध हा प्रत्येक माणसाला प्रसंग पाहून येतच असतो. फरक एवढाच आहे की कोणाला कमी प्रमाणात येतो तर कोणास अतिशय तीव्र स्वरूपाचा येतो. . बाकी राग मात्र सगळयांना येंतोच. या रागावर नियंत्रण फक्त संत महात्मेच करू शकतात. क्रोधामुळे असा परीणाम होतो की जो रागावतो त्याचाच रक्त दाब वाढण्याची शक्यता जास्त असते. याचे परीणाम सर्व शरीरावर होतात. एकदा रागावल्यावर स्नायूंमध्ये जो बदल होतो तो पूर्ववत येण्यास किमान एक तास तरी वेळ वाया जातो.

भक्त वामन म्हणतात-

स्वास्थ्यशत्रुः स्वयं क्रोधः शांतिसौख्यायुनाशकः !

मूर्खस्य लक्षणं क्रोधः शांतिः सन्तस्य लक्षणम् !!

याचा अर्थ असा की, स्वतःचा क्रोध हा स्वतःच्याच आरोग्याचा, शांतिचा, सुखाचा व दीर्घायुष्याचा शत्रु आहे तसेच क्रोध हे मुर्खाचे लक्षण आहे आणि शांति हे खऱ्या संताचे किंवा ज्ञानी पुरूषाचे लक्षण आहे. हे सगळं माहित असलं तरी क्रोधावर विजय मिळवायचा असेल तर विवेक असावा लागतो. आजकाल तर या क्रोधावर औषधोपचारसुध्दा करतात पण त्यापेक्षा जर खरंच नियंत्रण ठेवायचे असेल तर योगाभ्यासाचा आधार घ्यावा. विशेषतः आसन प्रकारामध्ये भू-नमनासन करावे. किंवा ध्यानानेसुध्दा बराच फरक पडू शकतो. असे म्हणतात राग आल्यास बाहेर कोठेतरी निघून जावे किंवा एक दोन तीन अंक म्हणावे. मुख्य उद्देश मनाला कोठेतरी ताबडतोब व्यस्त करणे. या क्रोधावर जर आपण नियंत्रण ठेवू शकलो नाहीतर ज्याप्रमाणे मोठी वादळे झाडांना उलथून पाडतात किंवा त्सूनामी सारख्या निसर्ग घटनांनी जसे जापानसारखी शहरे उध्वस्त होतात त्याचप्रमाणे मनुष्याचा क्रोधाग्नीही स्वतःच्या भोवताली प्रलय निर्माण करतो. यामुळे संकटे आणि विनाश क्रोधी स्त्री पुरूषांच्या डोक्यावर सारख्या घिरटया घालत असतात.

सर्वसाधारणपणे असे आढळते की जे अधिकाराने कमी पदावर कार्यरत असतात जसे की सेवक किंवा नोकरवर्ग यांचे वरच नेहमी राग दर्शविल्या जातो पण त्यांचे पेक्षा वरीष्ठ मंडळी भेंटली की मग ते वरीष्ठांसमोर शेपूट घालून बसतात. या सर्व बाबी विचार करण्यासारख्या आहेत.

आजच्या जगात वावरतांना कोणत्याही प्रसंगाचा अतिरेक होणार नाही किंवा ते प्रकरण किमान शब्दांनी तरी वाढणार नाही याची प्रत्येकाने काळजी घ्यायला पाहिजे अन्यथा फायदा तर सोडाच पण दोघांचेही नुकसान होण्याची फार शक्यता असते. आपण दुसऱ्याशी ज्या पध्दतीने वागतो त्याच पध्दतीने इतरही व्यक्ति आपल्याशी वागू शकतात. मग अशा बाबी आपल्यावर ही उलटायला वेळ लागत नाही. घरमध्ये तर बरेचदा क्षुल्लक कारणावरून वाद इतका टोकास जातो की मग दोघांमध्येही एक प्रकारचा इगो निर्माण होतो व नेमकी माघार कोणी घ्यायची हेसुध्दा ठरवायला तेथे कोणीच मदतीस नसतो. अशा प्रकारच्या बऱ्याच बाबी स्वामी शिवानंदाच्या पुस्तकामध्ये आपल्याला मार्गदर्शनासाठी दिलेल्या आहेत त्या दृष्टीने 'जीवनाचा सदुपयोग' हे पुस्तक अवश्य वाचावे. हे पुस्तक थोडे जुन्या पध्दतीने लिहीलेले आहे परंतु त्यातील आशय मात्र विद्यार्थ्यांना खचितच उपयोगी पडणारा आहे. अशा तऱ्हेची पुस्तके माझ्या वडिलांनी १९६८ ला माझ्याकडून वाचून घेतली होती करीता हाच जीवनाचा सदुपयोग आपल्याही कामी पडावा हीच सदीच्छा!

# स्वास्थ्य शुध्दि

स्वास्थ्य शुध्दि म्हणजेच Health conscienceness. आजकालच्या धकाधकीच्या व धावपळीच्या काळामध्ये प्रत्येक माणसाला वेळ ही इतकी महत्वाची झाली आहे की, कोणते काम केंव्हा व कसे करावे याबाबत विशेष असे नियोजन करावे लागते तरच ते यशस्वी होवू शकते. शरीर स्वास्थ्याचा आपल्याशी अगदी जवळचा संबंध असल्याने त्याकडे विशेष लक्ष पुरविणे ही आजच्या जगात वावरतांना काळाची गरज झाली आहे. याला मुख्य कारण कोणालाही साधा सर्दी-पडसा जरी झाला तरी आजकालचे डॉक्टर भरमसाठ पैशाची विल्हेवाट सामान्य माणसाला करावयास लावतात. म्हणजेच थोडक्यात एवढया प्रकारच्या शारीरीक टेस्ट ते करायला लावतात की, जसे एखादी मनुष्य न्यायालयात केस लढतांना त्रासून ती सोडून देवून माघार घेतात त्याचप्रमाणे गरीब वर्ग बिचारे या तब्येतीला डॉक्टरपायी कंटाळून ती बिमारीच सोडून देतात व सरळ सरळ मरण पत्करण्यास तयार होतात. हा आजचा अनुभव आहे. या अशा प्रकारामुळे प्रत्येक व्यक्ति आजकाल संध्याकाळी बाहेर फिरायला निघालेला आहे. म्हणजेच थोडक्यात मेडिकेशन कडून

मेडिटेशन कडे वळला आहे असे म्हणावयास हरकत नाही. वास्तविक डॉक्टर मंडळीची यात काही चूक नाही कारण आज एवढे शोध लागले आहेत की किमान आधी आपल्याला प्रत्येक रोगाची चाहूल तरी लागते त्यामुळे आपण सावध होतो व बऱ्याच पैकी आपण आपला मृत्यु पुढे ढकलू शकतो. पूर्वीच्या काळात तर हजारो माणसे कशी मृत्युमुखी पडत होती हेच कळत नव्हते. व आजच्या काळात तर एखाद्या पेशंटला कोमामध्येसुध्दा सहा सहा महिणे ठेवता येवू शकते. हीच विज्ञानाची करामत आहे.

आजकाल पूर्वीच्या सारख्या व्यायामशाळा नाहीत त्या सध्या कालबाहय झाल्या आहेत. आज अत्याधुनिक हेल्थ सेंटर्स निघालेली आहेत. त्यात माडर्न मशिनरींचा वापर करून व्यायाम करावा लागतो. पण पूर्वीची पध्दतीच योग्य होती असे कधी कधी वाटायला लागते कारण त्या पध्दती नैसर्गिक होत्या. मशिनरी द्वारे केलेला व्यायाम दीर्घ काळ टिकत नाही असे दिसून येते. या व्यायाम व आरोग्याबाबत भक्त वामन म्हणतात-

व्यायामाल्लभते स्वास्थ्यं दीर्घायुष्यं बलं सुखम् !
आरोग्यं परमं भाग्यं स्वास्थ्यं सर्वार्थ साधकम्!!

थोडक्यात असे की व्यायामामुळे उत्तम आरोग्य, दीर्घायुष्य, बल, सामर्थ्य व सुख यांची प्राप्ती होवून मानवाला फार मोठा लाभ होतो. यासारखे मानवी जीवन सुखी करण्यास दुसरे कोणतेही साधन सर्वोत्कृष्ठ म्हणून जगात उपलब्ध नाही. आपण जर निसर्गाचे अवलोकन केले तर असे आढळते की अगदी आपल्या जन्मापासून बालकाच्या शारीरीक हालचाली सूरू होतात. त्याचे रडणे ही क्रियासुध्दा व्यायाम प्रकारात मोडते. तो झोपला असतांनासुध्दा सारखे हातपाय हलवित असतो. अगदी प्राण्यांकडे जरी दृष्टी फेकली तरी असे आढळते की प्रत्येक प्राणी स्वतःचे अन्न मिळविण्यासाठी सारखी धडपड व मेहनत करीत असतो. पण आजकाल आपली जीवनशैली ही पूर्णतः बदलली असल्याने बरीच कामे ही एका जागेवर बसून करावी लागतात त्यामुळे शरीराच्या काही भागाला अजिबात व्यायाम मिळत नाही. व सारख्या बडबडीमुळे संध्याकाळी डोके अगदी ठणठणून जाते. या सर्व बाबींवर नियंत्रण फक्त व्यायामाच्या आधारानेच होवू शकते असे वाटते. चोविस तासात या

महत्वाच्या बाबीसाठी वेळ राखून ठेवणे अत्यंत महतवाचे आहे. हे विशेषतः विद्यार्थ्यांसाठी सांगणे आहे. आम्हा जरा जुन्या काळातले च म्हणावे लागेल. माझे वडिल तर संध्याकाळी व्यायाम जर झाला नसेल तर जेवावयास बसू देत नसत. आजकालची मुले तर संध्याकाळी घरी सापडतच नाही त्यांचा हा वेळ ईतर मनोरंजनासाठी ठेवलेला असतो. पूर्वी एवढी अत्याधुनिक साधने नसल्याने नकळतच व्यायाम घडत होता पण आजचा काळ फार बदलला आहे त्यामुळेच या हेल्थ कॉन्शसनेसला महत्व आहे एवढेच येथे सांगण्याचा उद्देश आहे. बाकी सर्व सूज्ञ आहेतच याची मला पूर्ण जाणीव आहे.

आजही आपण प्रत्यक्ष डोळयाने बघत आहोत की आपली पूर्वीची आजोबा मंडळी कशी ऐंशी वर्षाची असून तब्येतीने ठणठणीत आहेत याचे मुख्य कारण त्यांचा पूर्वीचा व्यायाम. या उलट आजकाल एवढया सुविधा उपलब्ध असूनही जास्तीत जास्त लोकं साध्या साध्या बिमारीने मृत्यूमुखी पडत आहेत. आणि त्यातही भर म्हणजे नवीन रोगांची उपलब्धी. असे काही विचित्र रोग निर्माण होत आहेत की त्यांची नावेसुध्दा नवीन प्रकारे शोधलेली आहेत. ऐकावं ते नवलचं असं म्हणतात. मी आपणास एका अशा रोगाचे नांव सांगतो की तो जगातील सर्वात मोठा असा शब्द असून त्यात एबीसी असे ४५ लेटर्स आहेत. हे एका मायनर्स लंग डिसीजचे नाव आहे असे म्हणतात व त्याची नोंद ऑक्सफर्ड डिक्शनरीमध्ये जगातला लांब शब्द म्हणून घेतलेली आहे. त्याचे स्पेलींग असे-

Pneumonaultromicroscopicsilicavolcanoconeasis.

……………………………………………………….

# जीवनाचा आशय

मानवी जीवनाची श्रेष्ठता ही जीवनाचा आशय काय आहे हे ओळखण्यातच आहे. कारण ''मानवी जीवनं साक्षात् ईशजीवन सदृशम्! आहे असे म्हणतात. जर मानवी जीवन हे प्रत्यक्ष ईश्वरासारखे आहे तर परोपकाराच्या मार्गाने ईश्वरत्व प्राप्त करून घेणे हे या जीवनाचे अंतिम ध्येय असले पाहिजे. ईश्वर आहे किंवा नाही हा मानवी तर्काच्या पलिकडचा खेळ आहे. पण या विश्वात ईश्वरत्व हा गुणधर्म मात्र वैश्विक असल्याचे जाणवते. त्यामुळेच हा सृष्टीचा पसारा कोणत्यातरी आदेशान्वये व नियमानुसार सतत चालेलला आढळतो. आपल्या मानण्या न मानण्याने या विश्वातील नियमांवर काहीही परिणाम होत नाही. तेंव्हा सकारात्मक विचार करूनच जीवनाचा आशय समजून घेतला पाहिजे. परोपकाराने ईश्वरत्व प्राप्त होत असले तरी आजच्या जगात परोपकाराची परतफेड परोपकारानेच होइल हे सांगता यायचे नाही. तेंव्हा सापेक्षतेचा विचार केला तरी कधी कधी जशास तसे वागणे अशा तत्वांचा अवलंब करावा लागतो. आजचं जग टिकून आहे ते केवळ पांच टक्के लोकांच्या चांगुलपणावर.

आजच्या वैज्ञानिक युगात जोपर्यंत आत्मतत्वाचे रहस्य विज्ञानास कळत नाही तोपर्यंत तरी या शरीरात वास करीत असलेल्या आत्म्यावर विश्वास ठेवावा लागतो व तसे गृहीतही धरावे लागते. या आत्म्याचे अंतिम ध्येय हे सत्य शोधण्याचे आहे मनुष्य तर्कबुध्दि व अनुभवाने या सत्याचा शोध लावण्याचा प्रयत्न करीत आहे पण असे आढळून येते की हे आत्मतत्व तर्काच्या व अनुभवाच्याही पलिकडचे असावे की काय याचा थांग पत्ता लागत नाही. तरीसुध्दा त्याची प्राप्ती हेच आज मानवाचे अंतिम ध्येय आहे व  हाच जीवनाचा आशय होय. जे कृष्णमूर्ती किंवा

ओशो सारख्या विद्वानांनी यावर फार विचार केलेला आढळतो त्यामुळेच ते कोणत्या शास्त्रांचा विचार न मांडता प्रत्येकाने आपापल्या बुध्दिपरत्वे स्वयंकेंद्री व्हावयास पाहिजे अशा तऱ्हेच्या थिअरीज मांडलेल्या आहेत. व त्याप्रमाणे मानवी जीवनाचा विकास घडावा या दृष्टीने बराच प्रयत्न केला आहे. ते विचार आत्मसात करण्यासाठी प्रथम त्यांनी काय सांगितले हे निट ऐकूण घेण्याची क्षमता पाहिजे अन्यथा पालथ्या घडयावर पाणी असेच होईल. व परीणामतः आजचा माणूस पून्हा आपल्याच ज्ञानाच्या कक्षेत घिरटया घालत फिरेल पण त्यास या मानवी जीवनाचा खरा आशय कधीच कळणार नाही.

आजच्या जगात वावरतांना एक बाब विशेष म्हणजे प्रामुख्याने लक्षात येते की, आजकालची मुले किंवा सध्याची ही पिढी पूर्वीच्या मुलांपेक्षा जरासी शार्प आढळते. तेंव्हा त्यांचे शार्पनेसमध्ये आपण अडथळा न आणता त्यांना स्वयंकेंद्रीत होवू दयावे व स्वतःचे निर्णय स्वतः घेवू दयावे. त्यांचेवर उगीच जुन्या रूढीचा पगडा पाडण्याची फारशी आवश्यकता वाटत नाही. फक्त आपण दूरदृष्टीने आपल्या अनुभवांवरून मार्गदर्शन करण्यास हरकत नाही. परंतू अंतिम उद्दीष्ट त्यांचे त्यांनाच गाठायचे आहे याची फक्त जाणीव देत राहावे. या जगात वावरतांना आपली लाइफ स्टाइल आपल्यालाच ठरवायची आहे. त्यामध्ये फक्त डुप्लीकेट नको. कारण जर दुसऱ्याची नक्कल करीत असू तर मग अधोगति होण्याचे चान्सेस जास्त असतात. दुसऱ्याची नक्कल करणे, दुसऱ्याशी स्पर्धा करणे, इतरांची इर्षा करणे हे सर्व मानवी स्वभावाचे पैलू आहेत पण आपल्या जीवनाला असेच पैलू पाडावे की जसे कोळश्याच्या खाणीत हिरा निघावा...

दुसऱ्याची नक्कल केली तर त्यात आपली प्रतिभा दिसून येत नाही. स्वतःची प्रतिभा ही तेंव्हाच सिध्द होइल जेंव्हा आपण प्रयत्न करू. जर प्रयत्नच केला नाही तर हे कसे ठरवायचे की आपल्यात काय आहे. वास्तविक परमेश्वराने प्रत्येकास स्वतंत्र असे निर्माण केले आहे तेंव्हा आपल्यासारखे दुसरे कोणी कसे असणार. आज जर असा विचार केला की सर्व प्रकारचे शोध लागलेलेच आहे तर पुढील रहस्य कोण उलघडणार...विज्ञान तर म्हणते की आजपर्यंत आपणास जे

माहीत झाले आहे त्यापेक्षा कितीतरी पटीने या विश्वात अजून रहस्य दडलेले आहे. या नक्कल करण्याच्या प्रवृत्तीबाबत एक दोन उदाहरण येथे सांगण्याचा मानस आहे.

अलिकडे मी एका बीबीसी नॉलेज या मासिकामध्ये असे वाचले आहे की, आजच्या संगणक प्रणालीमध्ये नुकताच Artificial Intelligence चा वापर सूरू झाला आहे. या आर्टीफिसीयल इंटेलिजन्सने विविध डेटावरून असा शोध लावला आहे की शेक्सपियरचे साहित्यसुध्दा काही पुरातन पुस्तकांवरूनच जसेच्या तसे घेतलेले आहे. आता दुसरे उदाहरण पाहू. अमेरिकेत थंड प्रदेश असल्याने तेथील मंडळी, शरीरात गर्मी येण्यासाठी वाइनचा आधार घेतात म्हणजेच थोडक्यात दारू पितात... पिऊ पिले तर. . कारण त्यांचा प्रदेशच तसा आहे व तेथील वातावरणसुध्दा त्या मद्याला शोभेल असे आहे ...तो श्रीमंत देशही आहे...पण याउलट त्याचीच नक्कल म्हणून आपल्या देशात भरमसाठ उन्ह असूनही आपल्या भारतात दारू पिल्या जातेच की नाही...दारूचा जर आर्थिक दृष्टया जरी विचार केला तर एकदाचे खायचे तेल स्वस्त आहे पण ही दारू मात्र चक्क ५०० रूपये ते ५००० रूपये लिटरपर्यंत महाग आहे. या बाबी खचितच विचार करण्यासारख्या आहे. मौज म्हणून दारू प्यायची असेल तर एकदा एखादा पेग घेवून पाहण्यास हरकत नाही पण किमान त्याचे आहारी न जाणे च उत्तम ...आजचा काळ लक्षात घेता मी ही अल्प अशी परवानगी सूचित केली आहे. उगीच मनावर न पिण्याचेही दडपण कशाला...कारण अल्कोहोल हे आरोग्याला ही काही प्रमाणात आवश्यक असतेच. असे मेडिकल सायन्स म्हणते. उपरोक्त नक्कल करण्याच्या बाबतीत माझे असे मत आहे की, दुसऱ्याची नक्कल करण्यापेक्षा, आपले वर्तन वा गुणधर्म इतके चांगले असावेत की दुसऱ्याने आपली नक्कल करावयास पाहिजे. शेवटी स्वतःची जीवनशैली आपण स्वतःच निर्माण करणे हाच खरा स्वतःच्या जीवनाचा आशय ठरविणे होय. आणि इतःपर नक्कल करायची असेल तर चांगल्या गोष्टींची नक्कल करावी.

...........................................

# जीवनाचा अंत

आपण सर्व पृथ्वीनिवासी आहोत. ज्याअर्थी जन्म झाला आहे त्याअर्थी मृत्यु हा निश्चितच आहे. हा या निसर्गाचा अटळ नियम आहे. मृत्युनंतर नेमकं काय होतं हे कोणीच सांगू शकत नाही तरीसुध्दा जे जास्त जिज्ञासू असतील त्यांनी इंटरनेटवर After death experiences अशा वेबसाइट्स पहाव्यात म्हणजे काही अंशी मनाचे समाधान होवू शकेल. पण त्या तितक्या विश्वसनीय नाहीत असेच वाटते. या मृत्युबाबत मात्र भगवान कृष्ण गीतेमध्ये दुसऱ्या अध्यायातील बावीसाव्या श्लोकामध्ये म्हणतात-

वासांसि जीर्णानि यथा विहाय नवानी गृह्नांति नरोपराणि !
तथा शरीराणि विहाय जीर्णान्यन्यानि संयाति नवानि देही !!

अर्थात ज्याप्रमाणे जीर्ण वस्तू टाकून देवून, माणूस दुसरी नवीन वस्त्रे धारण करतो त्याचप्रमाणे देहधारी आत्मा -जीवात्मासुध्दा जीर्ण निरूपयोगी झालेली शरीरे मृत्युनंतर टाकून देवून पुनः स्वतःच्याच इच्छेनुसार जन्म घेवून नवीन स्थळी नवीन शरीरात प्रवेश करतो व प्रकट होतो. त्यामुळे जीवनाचा अंत झाल्यास इतरांनी कधीही वाइट वाटून घेवू नये, असे स्वामी शिवानंद यांचे ''जीवनाचा सदुपयोग '' या पुस्तकामध्ये ते आपल्याला सांगतात. ते पुढे म्हणतात- मृतांबद्दल रडण्यांमुळे मृताच्या आत्म्याला भयंकर क्लेश होवून त्यांना शांति लाभत नाही. मृतांबद्दल रडणे म्हणजे ईश्वरी योजनेचा अपमान करणे होय.

अशा प्रकारे जीवनाचा अंतच होत असेल तर समर्थ रामदास स्वामी म्हणतात ‘मरावे परी किर्ती रूपे उरावे. “ याचा स्पष्ट अर्थ असा की या जगात येणाऱ्या प्रत्येक व्यक्तिने काहीतरी विशेष असे कृत्य करावे की आपल्या मृत्युनंतर ते कार्य या जगात इतरांच्या उपयोगी पडावे. माणसाचा नाश होत असला तरी त्याचे विचारांचा किंवा कर्माचा नाश कधीच होत नाही. म्हणूनच ज्ञान व कर्म हे मृत्युनंतरही आपल्या सोबत येतात असे शास्त्रात सांगितले आहे. आजपर्यंत अनेक शास्त्रज्ञांनी जे परीश्रम करून अनेक शोध लावले त्यामुळेच आपण आज सुख उपभोगत आहोत. हे त्यांनी आपल्यावर केलेले अनंत असे उपकार होत पण आज त्या व्यक्ति जगात हयात नाहीत. म्हणूनच कवीसुध्दा म्हणतात या जन्मावर, या जगण्यावर शतदा प्रेम करावे. साने गुरूजीसुध्दा म्हणत असत की खरा तो एकचि धर्म, जगाला प्रेम अर्पावे.

मृत्यु कोणावर केंव्हा, कोठे, कशी झडप घालील, याचा कांहीच नेम नाही. व त्याची वेळही निश्चित नसल्याने या जगात वावरतांना मृत्युचे भान ठेवूनच चांगली कामे करावीत. मृत्यु म्हणजे शेवटची निद्रा नसून शेवटची जागृति होय! मानवाने पूर्ण पवित्र, श्रेष्ठ, उत्तमव धर्मनीतीमय आदर्श जीवन जगावे! यातच जीवनाचा खरा सदुपयोग आहे ! असे स्वामी शिवानंद महाराज म्हणतात.

............................................

# आजच्या जगात वावरतांना

''आजच्या जगात वावरतांना'' या माझ्या लहानशा पुस्तकामध्ये सुरूवातीला आपण आजच्या काळाची काय स्थिती आहे हे पाहले. त्यात वैज्ञानिक बदल कसा होत गेला व काळाच्या या बदलामुळे आपण आज कोणत्या अवस्थेत येवून पोहोचलो आहे हे लक्षात घेतले. त्यानंतर आजच्या दैनंदिन बाबीमध्ये नेमके काय महत्वाचे आहे व त्यानुसार कसे वागावयास पाहिजे हेसुध्दा पाहले. तद्वतच मुलांची घडण कशी करावी याची चर्चा केली आहे. त्यानंतर मानवी मनाचा तसेच ईश्वर, श्रध्दा, अंधश्रध्दा याबाबत मी माझे विचार मांडले. आजचे जग हे माहिती तंत्रज्ञानाचे युग असल्याने इंटरनेटच्या माध्यमातून किंवा पुस्तकांचे महत्व लक्षात घेवून आपला ज्ञानसंग्रह कसा वाढवावा तद्वतच मित्र मंडळी, नातेवाईक कशी मिळवावी व ती कशी टिकवावी याबाबत संक्षिप्त विवेचन आलेलेच आहे. समाजात वागतांना परोपकार, पैशाचं मूल्यं, मानवी गरजा व त्यासाठी आपण करीत असलेली धावपळ कितपत आवश्यक आहे असाही थोडक्यात अभ्यास केला आहे.

याशिवाय जिद्द, चिकाटी विनोद बुध्दि, जीवनाचा आशय व शेवटी अशा जवळपास सर्वच बाबीवर प्रकाश टाकला आहे. अर्थात हे सर्व विषय सविस्तर लिहीतो म्हटले तर फार मोठा ग्रंथच तयार होइल परंतू आजच्या जगात वावरतांना कामाच्या व्यस्ततेमुळे एवढा वेळ विद्यार्थी किंवा कोणाही देवू शकणार नाही या उद्देशाने सर्व पकरणे आटोपती घेतलेली तुम्हास आढळेल. तरीसुध्दा संक्षिप्त स्वरूपात सांगायचे झाल्यास जसा जसा काळ बदलतो तसा तसा मानवाने आपल्या स्वभावात परीवर्तन करीत गेले पाहिजे व जुन्या प्रकारच्या काही रूढी व परंपरांना काळाच्या बदलानुसार बदलविले पाहिजे नाहीतर या अंधश्रध्देचे जुने मूळ कोणीच उखडून टाकू शकणार नाही. असे वाटते. Everybody try to changes the world, but nobody changes himself, हे लिओ टॉलस्टॉयचे वाक्य खरे वाटायला लागते.

मी, मला जे विचार सुचत गेले ते यथा बुध्दि लिहिलेले आहे. हे सर्वच विचार आपणास पटतील असा माझा आग्रहसुध्दा नाही. उद्देश केवळ एवढाच होता

की आजच्या विद्यार्थ्यांना तरी काही मार्गदर्शन व्हावे. हे वाचल्यानंतर कोणाच्या जीवनात थोडा जरी प्रकाश पडला तरी माझ्या प्रकाश या नावाचे सार्थक झाले असे मला वाटेल व त्यातच मला समाधान आहे. वास्तविक केवळ विरंगूळा म्हणून मी हे पुस्तक हातात लिहावयास घेतले त्यामुळे कोणास मी फार उपदेशाचे डोस आपणास पाजले असे न समजता मनोरंजन व ज्ञान या दृष्टीकोनातून जरी आपण या लेखांकडे पाहले तरी मी आपला अतिशय आभारी राहील. मी सर्व चांगल्या बाबी सांगण्याचा प्रयत्न केला तो किती यशस्वी झाला असेल हे मी आपल्या सूज्ञ वाचकांवरच सोडतो आहे. यात काही चूक आढळून आल्यास मला माझ्या चुकांसहीत आपल्या पदरात घ्याल या सदीच्छेने या अल्पशा लिखाणास पूर्ण विराम देतो. धन्यवाद !.

••••••••••••••••••••••••••••••••••••••••••••••••••••

• •

# या ग्रंथ वाचनातून पुस्तक प्रेरणा प्राप्त

१. जीवनाचा सदुपयोग - स्वामी शिवानंद
२. Who will cry when you die - Robin  Sharma
३. Quotations from great masters - Chho Dev
4. Emotional Intelligence - Daniel Goleman
5. Other Men's flowers - D. Mehra
6. Chariots of God- Erich Von Daniken
7. श्रीमद्भगवद्गीता- गोरखपूर
८. स्वामी विवेकानंद ग्रथावली खंड १ ते १०
९. BBC Knowledge Magazine
10. The Power of being different - John Paul Carinci
11. The little books of one liners- Alision Bullivant
12. Joking Around -Osho
13. On learning and Knowledge - J. Krishnamurti
14. The wisdom of Bertrand Russell - Manjul Publications, Bhopal
15. Ask yourself questions and change your life - Arlene Harder
16. The limits of thought discussions - J. Krishnamurti & David Bohm
17. Sixth Sense - Stuart Wild
18. The scientific Indian - A. P. J. Abdul Kalam
19. हसता हसता आरोग्य - डॉ. मदन कटारीया
२०. English Edition big book of Quotation- English Edition
21. Unravel the power within you- Karan Sondhi
22. मी आतापर्यंत वाचलेली ६२५ पुस्तके

# लेखक परिचय

श्री. प्रकाश माणिकराव राऊत हे सध्या उपविभागीय अधिकारी या पदावर, मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, उत्तर महाराष्ट्र प्रदेश कार्यालय, नाशिक येथे कार्यरत आहेत. त्यांनी स्थापत्य अभियांत्रिकी पदविका १९७७ मध्ये, तसेच कला स्नातक ही पदवी १९९८ मध्ये इंग्रजी साहित्य व मानसशास्त्र हे विषय निवडून, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक येथून प्रथम श्रेणीत प्राप्त केली आहे. तसेच अतिरीक्त छंद म्हणून भारतीय योग विद्याधाम, नाशिक येथून योगशिक्षक हीसुध्दा पदविका १९९६ मध्ये पूर्ण केल्यानंतर समाजसेवा म्हणून अमरावती येथे तीन वर्षे योगाचे वर्ग तसेच शासकीय तंत्रनिकेतनात योग वर्ग व विदर्भात अनेक ठिकाणी योगावर भाषणे इत्यादी उपक्रम विनामूल्य केलेले आहेत. यांचेवर 'विशेष व्यक्ती' असा लेखही अमरावतीचे प्रसिध्द लेखक डॉ. गोविंद कासट यांनी दिनांक २४ मार्च १९९६ ला, अमरावती येथून निघणाऱ्या मातृभूमी या दैनिकात लिहीलेला आहे. त्यांना लहानपणापासूनच लिखाणाचा छंद असल्याने त्यांचे आजपर्यंतचे काही पत्र लिखाण व लेख अनुक्रमे द हितवाद, नागपूर टाईम्स, मातृभूमी, अकोला येथून प्रसिध्द झालेले आहेत. ते शासकीय पब्लीक स्कूलचे १९६७ ते १९७२ या बॅचमधील विद्यार्थी आहेत. हे त्यांचे दुसरे पुस्तक असून प्रथम पुस्तक ' नोकरशाहीतील बाळूच्या गमतीजमती ' या पूर्वी ज्ञानप्रकाशन, पूणे तर्फे प्रसिध्द झाले आहे. प्रकाश राऊत हे त्यांचे मित्रवर्गात पदाचा अधिकार विसरून अगदी मनमिळावू होवून जातात. त्यांचे साहित्य वाचतांना निश्चितच ज्ञानवर्धन होते. दीर्घ लिखाणाचा यांचा हा दुसरा प्रसंग व प्रयत्न आहे. तेंव्हा वाचकांनी यांना भरपूर प्रतिसाद दयावा असे वाटते.

---

**प्रकाशक**

# ई साहित्य प्रतिष्ठान

मराठी ही एक सशक्त भाषा आहे. सशक्त म्हणजे – जे भाव मनात आहेत ते अत्यंत तरलपणे आणि अचूकपणे सांगण्याची क्षमता असणे. उदाहरणार्थ या भाषेत बोलणे या एकाच कृतीला बोलला, सांगितले, म्हणाला, सुनावले, ऐकवले, उच्चारले, स्पष्ट केले, बोलून टाकले, सुचवले, कुजबुजला, पुटपुटला, खडसावले ,विनवले ,असे असंख्य शब्द आहेत आणि या प्रत्येक शब्दाला एक स्वतःची अशी अर्थछटा आहे. आपण जेव्हा आपली भाषा वापरतो तेव्हा या छटा आपण व्यवस्थित बोलू व समजू शकतो. म्हणून मराठी साहित्याचा , वाचनाचा , पुस्तकांचा प्रचार आणि प्रसार भरपूर व्हायला हवा. म्हणजे आता आहे त्याच्या निदान दहा हजार पट. सध्याचा आपला साहित्य व्यवहार हा अगदीच छोट्या विहिरीपुरता मर्यादित झाला आहे. त्याला एखाद्या विशाल महासागराचं रूप द्यायचा आमचा प्रयत्न आहे. त्यासाठी आम्हाला तुमची मदत हवी.

ई साहित्यची पुस्तकं विनामूल्य आहेत. ती तुम्ही कोणालाही कितीही देऊ शकता. त्यात दानाचं पुण्य मिळेल आणि खिशाला फ़ारसा खार न लावता. कृपया आपल्या ओळखीच्या किंवा माहितीतल्या लोकांना, संस्थांना, शाळांना, वाचनालयांना, कार्यालयांना , सोसायट्या, गावं, नगरपालिका, ग्रामपंचायत, ज्येष्ठ नागरिक संघ, महिला मंडळं यांत ई साहित्यची पुस्तकं पसरवा. त्यांची माहिती पुरवा. आमचे प्रतिनिधी व्हा. (मात्र बिनपगारी फ़ुल अधिकारी).

साहित्य प्रसाराचा हा बांध फ़ुटु दे. वाचू दे लोकांना. मराठी भाषा वैभवशाली होऊ दे.

काहीही मदत लागली तर आम्ही आहोतच. आपल्या उपक्रमांचे फ़ोटो आम्हाला पाठवा.

धन्यवाद

टीम ई साहित्य